श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥
ॐ नमो जी भगवंता । तुज नमो जी अव्यक्ता । कवित्व-
मती वसुदेवसुता । द्यावी मज ॥ १ ॥ मग नमो
आदिशक्ती । जे जाणे परब्रह्मप्रकृती । चैतन्यमाया
विख्याती । ती ईश्वरशक्ति नमस्कारिली ॥ २ ॥ आतां
नमूं विश्वजननी । जी अर्जुनाची मोहिनी । आतां नमो
येथूनि । महाऋषीश्वर ॥ ३ ॥ आतां नमो कवीश्वरां ।
ज्यांहीं वर्णिलें परमेश्वरा । अरूप आणोनियां आकारा ।
उपकार जगासी पैं केला ॥४॥ होतीं अज्ञान अंध मूढीं ।

परब्रह्म नेणती बापुडीं । त्याचिया रूपगुणांची गोडी ।
कांहींच परवडी न होती ॥ ५ ॥ त्या व्यासऋषीचा प्रसादु ।
त्याणें कथिला प्रेमबोधु । तो संस्कृत अर्थवादु । न कळे
अल्पज्ञानियां ॥ ६ ॥ म्हणोनि केलें प्राकृत । पूर्वीं व्यासाचें
संस्कृत । म्हणोनि उपकार बहुत । झाले जगीं ॥ ७ ॥
आतां नमो भक्तभाग्यवंतां । जे अनुसरले कृष्णनाथा ।
मग नमो मातापिता । आणि विप्रकुला ॥ ८ ॥
या उपकारास्तव नमस्कारु । नमिला श्रीज्ञानेश्वरु ।
[illegible] केलिला ॥ ९ ॥

येथूनि कथा सांगेन पवित्र । जें मोक्षदायक गीताशास्त्र । हें प्रतिदिनीं पढतां पवित्र । होती चतुर्भुज ॥ १० ॥ या शास्त्राची थोरी । देव नेणती अवधारीं । उपमा द्यावया धरित्री । थोडीच असे ॥ ११ ॥ हें रोगव्याधींसी औषध । तोडी देहाचा पीडाकंद । तैसे जीवाचे भवबंध । ही भगवद्गीता ॥१२॥ ते सांगेन अल्प थोडी । ऐकतां यमदूत बापुडीं । या गीतेची प्रौढी । सांगे ज्ञानदेव ॥ १३ ॥ कौरवां पांडवां संग्राम झाला । सकळ कौरवभार जिंकिला । दुर्योधन रणासी आला ।

बंधूंसमवेत ॥१४॥ कर्ण द्रोण पडिले । भीष्म रणासी
आले । पांडव विजयी झाले । मग भेटले धृतराष्ट्रा ॥१५॥
धृतराष्ट्र म्हणे संजयासी । काय झालें कौरवांसी ॥
तयांची स्थिति कैसी । तें मजप्रती सांग पां ॥१६॥
संजय म्हणे धृतराष्ट्रा । परियेसीं राजा पवित्रा ॥ पूर्वींचिया
भवक्षेत्रा । शरण जावें ॥१७॥ कृष्ण आला शिष्टाई ।
कौरव न देतीच कांहीं । संग्रामाची लवलाही ।
सामग्री केली ॥१८॥ मग रणभूमीसी आले । दोघांचे
भार सन्निध झाले । तेथें कैसें अपूर्व वर्तलें ।

परियेसीं धृतराष्ट्रा ॥१९॥ संजय म्हणे राया परियेसीं । अकरा अक्षौहिणी दळ कौरवांसी । सात अक्षौहिणी परियेसीं । वीर पांडवांचे ॥२०॥ त्या दोंही दळां समदृष्टी झाली । दोघांचीं सैन्यें मिळालीं । तेथें वाद्यें गर्जिन्नलीं । कौरवांचीं ॥ २१ ॥ रणतुरें गर्जिन्नलीं थोर । तेणें दणाणिलें मेरूशिखर । मृदंग काहळा रणमोहर । संख्या नाहीं ॥ २२ ॥ निशाणभेरींचा गजर । ढोल दमामे वाजती अपार । हाका देती कौरववीर । म्हणती संहारूं पांडवां ॥ २३ ॥ ऐसे गर्जत हाकीत पावले । एकापुढें

एक धांविन्नले । एकाहूनि एक आगळे । बोलती अहंता ॥२४॥ भोंवता कुंजरांचा भारु । मध्यें कर्ण द्रोण वीरु । आणि कौरवांचा बडिवारु । म्हणती पांडव बापुडीं ॥२५॥ तयांचा संग्राम दारुण । रणीं पडले कर्ण द्रोण । पुढें भीष्म वीर दारुण । रणीं उभा ठेला ॥२६॥ तें देखोनि पांडव वीर । ठाकोनि आले समोर । तयांसी म्हणे शार्ङ्गधर । उशीर न करावा झणीं ॥ २७ ॥ कौरवांचीं देखोनि प्रौढी । पांडवसैन्यें झालीं वेडीं । वाजंत्रें आकाश कड्राडी । घडीघडी देती हाका ॥२८॥

मग रणभूमीसी आले। पांडववीरीं कौरवभार देखिले।
वाजंत्रें बहिरावलें। अंबर देखा ॥ २९ ॥ मग श्रीकृष्णें
पांचजन्य शंख स्फुरिला। धर्माचा विजय गर्जिन्नला।
भीमाचा पौंड्र वाजिन्नला। अर्जुनें स्फुरिला देवदत्त
॥ ३० ॥ नकुळ सहदेव बळी। आणिक राजे सकळी।
काशीश्वर द्रुपदबळी। येहीं शंख स्फुरियेले ॥ ३१ ॥
तो नाद दुमदुमिला। मेरुमंदार कांपिन्नला। सप्तसमुद्र
हेलावला। शेष दचकला पाताळीं ॥ ३२ ॥ इंद्रादिकां
झाली अपांपरी। ते पहात ठेले अंबरीं। नादें कांपे

धरित्री । त्रिकुटशिखरें गजबजलीं ॥ ३३ ॥ गिरी पुरी भारती संन्यासी । त्यांहीं सांडिलें आश्रमांसी । श्वापदें पडलीं नादेंसीं । आटल्या बावी पोखरणी ॥ ३४ ॥ तेणें नादें कौरवांचें हृदय । सकळ वीरांचें फुटों पाहे । अर्जुन तये समयीं काय । बोलता झाला ॥३५॥ अहा जी जनार्दना । म्यां ओळखावें कवणा । त्या पाहोनि रथखुणा । मग मी संग्राम करीन ॥ ३६ ॥ मग देवें वायुमंत्र उपदेशिला । अर्जुन वायुरूपें गेला । कौरवभार पाहोनि देवासी बोलिला । धनुष्यभाते ठेवूनियां

॥ ३७ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेवनिरूपिता ।
प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ ३८ ॥
इति अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ पार्थ म्हणे वंशनिर्दाळणा ।
थोर पाप गा जनार्दना । राज्य न लगे मज जाणा ।
कवण पडिले सायास ॥ १ ॥ बंधु चुलते मामे गुरु ।
मेहुणे यांचा न करीं संहारु । गुरुबंधु कर्ण वीरु ।
हे कैसेनि मारावे ॥ २ ॥ या समस्तांसी मारणें । आणि

आम्हीं राज्य करणें । तुझिया प्रसादें काय उणें ।
आतांचि घेऊं आणिक राज्य ॥ ३ ॥ हा देह पडो धरित्रीं ।
परी मी गोत्रवध न करीं । थोर पाप गा मुरारी ।
कैशापरी मारविसी ॥ ४ ॥ तुझें दर्शन झालिया ।
सर्व पाप नासे स्वामिया । ऐसें हें असोनियां । कां
गोत्रवध करविसी ॥ ५ ॥ गोत्रवध ज्यांनीं केला । त्यांचा
स्वधर्म बुडाला । यमपुरीचा झाला । पाहुणा तो ॥ ६ ॥
त्यासी चांद्रायण प्रायश्चित्त । आणि कुंभीपाक अनंत ।
हें तूं सांगसी निभ्रांत । कवण्या हेतु मारविसी ॥ ७ ॥

आतां ते राज्य खावोत सकळी । तूं आमुचा
भुजाबळी । जें जें पाहिजे जे जे काळीं । तें तूं पुरविसी
आम्हांसी ॥ ८ ॥ मज राज्य करणें नाहीं सर्वथा ।
म्हणोनि चरणांवरी ठेविला माथा । आतां पुरे गा
अनंता । राज्य आणि संपत्ति ॥ ९ ॥ म्हणोनि ठेविले
धनुष्यभाते । तेही समर्पिले तूतें । कंठाहूनि सर्वांगातें ।
रोमांच ऊठिले ॥ १० ॥ पुढती केला नमस्कारु ।
आतां सर्वथा राज्य न करूं । गोत्रजातें न मारूं ।
तेचि मारोत आम्हांतें ॥ ११ ॥ मग म्हणे जनार्दन ।

पार्थी तूं नपुंसक अज्ञान । काय सांडितोसी अभिमान ।
अपयशपात्रा ॥१२॥ मर मररे अपेश आणिलें। जितांचि
मरण चिंतलें । कवण ज्ञान तुज सूचलें । हें न कळे
मज ॥ १३ ॥ मरणापरिस अपयश खोटें । हें तुज ज्ञान
जोडलें वोखटें । ज्याचेनि मोक्ष प्रगटे । तें तूं नेणसी पार्थी
॥ १४ ॥ मारिसी तूं कवण । मारविता मी एक जाण।
आत्मस्वरूप निर्वाण । त्यासी मरण कैचें ॥ १५ ॥ आत्मा
स्वरूपीं व्यक्त । मी परमात्मा अव्यक्त । इच्छा माझिये
खेळत । ही वैष्णवी माया ॥ १६ ॥ तो अमर असे

जाण । न जळे न तुटे न बुडे प्राण । आणि मजवांचून । त्यासी मारिता नाहीं ॥ १७ ॥ पार्था मज न पुसतां । तुवां सांडिली अहंता । मारिता आणि मारविता । तो मीच जाण ॥१८॥ तूं निमित्तासी कारण । आतां घेईं गा धनुष्य-बाण । यावरी बोलिला अर्जुन । करसंपुट जोडोनियां ॥१९॥ म्हणे ज्ञानेश्वर । तिसऱ्या अध्यायाचा विस्तार । तो सांगेन पवित्र । श्रोतीं चित्त देईजे॥२०॥ इति श्रीभग-वद्गीता । व्यासदेवनिरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव॥२१॥इति सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः॥२॥

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ मग म्हणे श्रीकृष्णनाथ। ऐक
पार्था पंचभूतें । या देहामाजीं वसत । आत्मा माझा
॥ १ ॥ मी परमात्मा दूसरा । करूनि ठेविला दसवे द्वारा।
त्यासी नाभिकमळीं थारा । या पंचप्राणांसी ॥ २ ॥
ऐकोनि म्हणे अर्जुन। तुम्हीं सांगितले पंचप्राण। त्यांचीं
नांवें कवण कवण । विस्तारूनि सांगा देवा ॥ ३ ॥
प्राण अपान व्यान उदान । पांचवा तो समान।
हा पंचभूतें आत्मा जाण । मजपासोनि उद्भवला ॥ ४ ॥
तो नाभिस्थानीं खेळत । माझ्या मायेचीं पंचभूतें।

अष्ट पांकोळिका तेथें । त्या पांकोळिके तीन पत्रें ॥ ५ ॥
ऐसा चौवीस पत्रीं त्याचा खेळ । तो प्राण असे ओढाळ।
तो नाकळे अकळ । धांवे मनासंगें ॥६॥ त्या मनाच्या
आधारें । खेळतीं तिन्ही शरीरें । त्या मनावीण दुसरें।
धांवूं न शके ॥७॥ मग अर्जुन म्हणे देवा । मनाचा
विस्तार सांगावा । देव म्हणे ऐक पांडवा । चित्त
देऊनियां ॥ ८ ॥ अरे मन तें मजपासून । परी असे
मायाधीन । मन आकळी ऐसा कवण । योगिया नाहीं
॥ ९ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेवनिरूपिता ।

प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ १० ॥ इति
कर्मयोगो नाम तृतीयोध्यायः ॥३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ पार्थ म्हणे केशवराजा ।
देहीं तूंचि नांदसी वोजा । किंवा अंश असे तुझा ।
हें देवा सांग मज ॥ १ ॥ पार्था मी अक्षर जाण । अक्षर
माझें लक्षण । तो असे व्यापून । सर्वां घटीं अलिप्त
॥ २ ॥ पर्येसीं पार्था सगुणा । तुझिया जन्मा नाहीं
गणना । येतांजातां लक्षवेना । नेमिलें नाहीं ॥ ३ ॥

तूं म्हणसी माझे गोत्रज। तरी तूं भुललासी सहज।
अनंत जन्म झाले तुज मज। ते मी सांगेन ॥ ४ ॥
तूं हिंडलासी नाना वंशीं। अनंत जन्म नेणसी। चारी
खाणी भोगिल्यासी। परी नेमिलें नाहीं ॥ ५ ॥ साळी
माळी तेली तांबोळी। शूद्र ब्राह्मण अनंत कुळीं।
वैश्य क्षत्रिय या भूतळीं। तूं झालासी पार्था ॥ ६ ॥
ऐशा केल्या येरझारा। त्या नाठविसी गा धनुर्धरा। येथें
उमजलासि एकसरा। जें मी न मारीं गोत्रज ॥ ७ ॥
अगा हें मृगजळ अवघें। अमर जाण ते दोघे। आणि

संगिये तिघे । एक नाशिवंत ॥ ८ ॥ अनंत शरीरें सोडुनी । तूं हिंडलासी नाना योनी । ओळखी धरीं अझूनी । जन्म तुझें माझें खंडेना ॥ ९ ॥ मग विनविलें पार्थें ऐसें । तूं देव आम्ही मनुष्यें । तुज जन्म जी कैसे । हें मजप्रती सांगिजे ॥ १० ॥ देव म्हणे गा धनंजया । मज कारण यावया ॥ साधुसंत रक्षावया ॥ संहारावया दुष्ट राक्षस ॥ ११ ॥ अरे परउपकारास्तव । मी अवतार धरीं माधव । मायेसवें लाघव । खेळत असें ॥ १२ ॥ अर्जुन म्हणे देवाधिदेवा । देव देहीं कीं वेगळा

पहावा । पिंडीं कीं ब्रह्मांडीं ओळखावा । कवणाची सेवा करूं आम्हीं ॥ १३ ॥ आत्मा व्यक्त पिंडीं । मी अव्यक्त ब्रह्मांडीं । व्यापुनी नवखंडीं । वेगळाचि असें ॥ १४ ॥ जे देही भजती मातें । ते पावती उत्तम देहातें । तेथें राहणें आत्मयातें । यासी संदेह नाहीं ॥ १५ ॥ पिंडीं अत्यंत पाप घडे । एकासी एक मारी कुडें । एक कुश्चळ कुष्टी वेडे । तैसा मी काय असें ॥ १६ ॥ एक रोगें जर्जर झाले । एकाचे हातपाय छेदिले । एक नासिकाबीभत्स केले । ते यातना काय

मज ॥ १७ ॥ एक भोगिती एकासी । सुळीं घालिती
तस्करासी । दुकाळीं मेले उपवासी । ते गति मज
कायसी ॥ १८ ॥ एक मात्रागमन करिती । एकासी
तारूनि मारिती । एक हिंसापाप न विचारती ।
ते गति मज कायसी ॥ १९ ॥ एक अमंगळ भक्षिती ।
श्वानसूकरविष्ठेची गति । एक ते नरकीं नांदती ।
ते गति काय मज ॥ २० ॥ एक राजानें दंडिले । एक
मन इंद्रियें उपद्रविले । एक उदकीं अग्नींत मेले ।
एक गेले अधोगतीं ॥ २१ ॥ एक पापी एक चांडाळ ।

एक मित्रद्रोही सर्वकाळ । हें पाप मी गोपाळ । काय करीतसें ॥ २२ ॥ जरी देहीं असे देवो । तरी या देहासी कां संदेहो ॥ तरी रंक आणि रावो । सारखेची असत ॥२३॥ सर्वा जीवीं मी असतों । तरी अवतार कासया घेतों । बापुडीं कौरवें कां मारवितों । त्यांचे देहीं असतां ॥२४॥ जरी असतों दोघांचे शरीरीं । तरी तूं भक्त ते कां वैरी ॥ पार्थ बोले याउपरी । तें अवधा-रिजे ॥२५॥ अहो जी देवराया । आत्मज्ञान तें कवण स्वामिया ॥ तें सांगावें कृपा करूनियां । मजप्रती

॥२६॥ मी अरूप निर्विकार । सकळ मायेचा विस्तार ।
अवघियांचा सूत्रधार । तो लाघवी मीच जाण ॥२७॥
अगा उदकीं असतीं कमळें । परी उदकासी नातळे ।
वायू व्यापूनि सकळ । परी तो अलिप्तचि असे ॥२८॥
सूर्यरश्मी सकळ । परी त्यांसी काय झाला विटाळ ।
तैसा आत्मा देहीं भूपाळ । खेळवीतसे ॥ २९ ॥ पाप
पुण्य माझे अंगीं । तरी कुंभीपाक मीच काय भोगीं ।
या गोष्टी माझिया स्वसंगीं । बोलूंच नये ॥ ३० ॥ मी
जरी देहींच असतों । तरी पाप कां करवितों । शेवटीं

कां भोगवितों । नरक यातना ॥ ३१ ॥ ऐसें नव्हे गा पार्था । हा विचार असे अरुता । व्यक्ता आणि अव्यक्ता । अंतर असे ॥३२॥ म्हणोनियां जीवाकारणें । म्यां केलीं तीर्थक्षेत्रव्रतदानें । मजलागीं नाना दर्शनें । झालीं गा पार्था ॥ ३३ ॥ म्हणोनी मजसी ध्यायिजे । आणि सर्व मज समर्पिजे । मग त्याचें संसाराचें ओझें । मजवरी पार्था ॥३४॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव-निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥३५॥ इति कर्मब्रह्मार्पणयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ पार्था मजचि ध्याईजे । अनायासें मिळेल तें मज समर्पिजे । माझिया स्वरूपा ओळखिजे । तेंचि आत्मज्ञान ॥ १ ॥ जैसें सुख दुःख आपुले देहीं । तैसेंच सर्वां भूतीं पाहीं । तरीच तूं ठायींच्या ठायीं । निवसील पार्था ॥२॥ आपणातें नेमावें । कामक्रोधांतें दंडावें । मदमत्सर खंडावे । तरी पावावें परम सुख ॥३॥ आशा मनशा तृष्णा । कल्पना इच्छा वासना । दंडावें इंद्रियमनां । तरीच स्वात्मसुख पावसी ॥४॥ आसनीं शयनीं भोजनीं । विसर नाहीं माझिये

स्मरणीं । त्या नांव आत्मज्ञानी । बोलिजे पार्थी ॥ ५ ॥
ऐसे जे नेमीं राहिले । ते आत्मसुख पावले ।
जे आचारा भंगले । ते लाधले दुःख जाण ॥ ६ ॥
इति श्रीभगव[illegible] व्यासदेवनिरूपिता । प्राकृत जाण
आतां । म्हण ज्ञानदेव ॥ ७ ॥ इति कर्मसंन्यासयोगो
नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ पार्थ म्हणे जनार्दना । बहु
चंचलता या मना । स्थिर [illegible] जीवभावना । त्यासी

दंडण सांगिजे ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे पार्था । योगी राहे निरुता । आवरेल संन्यासपंथा । जरी अविद्या सांडिल्या ॥ २ ॥ तये अविद्येच्या शृंखळा । फांसा न पडे गळां । मायामोहाच्या ज्वाळा । सांपडों नेदी ॥ ३ ॥ तो तुझा संन्यास अपार । जैसी खड्गाची तिखट धार । काळकूट वाटे मधुर । परी योग न घेववे ॥ ४ ॥ तो कैसा सांग देवा । पर्येसी गा पार्थिवा । आधीं आसनयोग साधावा । मग नेमाचा अहंभाव ॥ ५ ॥ आहार निद्रा मैथुन । यांसी कीजे दंडण । आहार तुटलिया जाण ।

प्राणरक्षण गलितपत्रें ॥ ६ ॥ संगीं एकचि असावा ।
त्यासी कलहो न करावा । कां संगें पाळावा । हुताशन
॥ ७ ॥ दश इंद्रियांचा नेम । झालिया योगधर्म । या
नांवें संन्यासकर्म । साहींचा न्यास करावा ॥ ८ ॥
आत्मा असे नाभिस्थानीं । अष्ट पाकोळिका तयाचीं
खेळणीं । त्या घेईजे हिरोनी । योगबळें ॥ ९ ॥ प्राण अधो
तो ऊर्ध्व करावा । व्यान नाडीचा काढावा । ऊर्ध्व बळें
ओढावा । न्यावा दशमद्वारा ॥ १० ॥ आत्मया
परमात्मया । परम सुखें भेटी झालिया । मग तो न वचे

वाया । स्मरण विसरतां ॥ ११ ॥ न जितां इंद्रियदंडण । न जेवितां तृप्त मन । ऐसा योगी समान । तो आत्मज्ञानी बोलिजे ॥ १२ ॥ नवही द्वारें रोधूनि । श्वास उच्छ्वास नेमूनि । आत्मा कोंडी त्रिकूटभुवनीं । तोचि योगी जाण पां ॥१३॥ दोघां घालूनि गांठी । परमात्मा पहावा दृष्टी । तैं हृदयीं मी जगजेठी । प्रगटें पार्था ॥ १४ ॥ मग बोले हे भक्तराजा । केवढा प्रताप माझा । हें असाध्य साधन पैजा । हें कवणासी ना घडे ॥ १५ ॥ हें अवघड गा दातारु । म्हणोनि केला नमस्कारु । मग बोले

सर्वेश्वरु । माझें वचन परियेसीं ॥ १६ ॥ या योगाहुनि योग उत्तम । या साधनापरिस साधन परम । या धर्मा आगळा धर्म । त्याचें आचरण सांगेन ॥ १७ ॥ जेणें मी हृदयीं असें । अखंड तुझे मनीं वसें । तो हा परम योग संन्यासें । गृहाश्रम हा ॥ १८ ॥ ऐसियापरी परम बोध । सांगितला उत्तम योग । करीं याचा तूं लाग । तंव अर्जुन बोलिला ॥१९॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेवनिरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ २० ॥ इति आत्म-संयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः । पार्था सर्वांपरीस उत्तम साधन । करीं माझें नामस्मरण । उच्छिष्ट नको करूं मन । आणिका ठायीं ॥ १ ॥ जैसी कां पतिव्रता । आणिक धर्म नेणे सर्वथा । सर्व व्रत दान कथा । पतिचकारणें ॥ २ ॥ कां चातकपक्षिया । तो स्मरे मेघराया । भूमीचें उदक तया । घेणेंचि नाहीं ॥ ३ ॥ तैसें मजवीण जाण । न करीं दुजयाचें स्मरण । कांहीं मिळालिया ब्रह्मार्पण । करीं पार्था ॥ ४ ॥ पत्र पुष्प फळ उदक । हें भजन माझें सात्त्विक । नको सुचूं देऊं आणिक ।

मजवेगळें ॥ ५ ॥ मी तारिता आणि मारिता । अर्जुना मीच उद्धरिता । मजवांचूनि सर्वथा । सृष्टिरक्षिता कवण असे ॥ ६ ॥ माझीं पंचतत्त्वें मिळोन ॥ पृथ्वी आप तेज वायु गगन । हें गेलिया फांकोन । उरे माया भ्रांती ॥ ७ ॥ सर्व जन्मांच्या शेवटीं । हा मनुष्यजन्म पावे पाठीं । यापरी उत्तम किरीटी । म्यां रचिलें नाहीं ॥ ८ ॥ येणें जन्में मज ओळखावें । येथेंचि आपणातें उद्धरावें । आणि येथेंचि जोडावें । नरक यातनेसी ॥ ९ ॥ बहुत हिंडता योनि । सोडविता

नाहीं कोणी । अनेक सुकृतांपासूनि । पाविजे नरदेह ॥ १० ॥ येथें मज न ओळखती । नाना आचरणें करिती । नाना दैवतें भजती । नेणती माझें ज्ञान ॥ ११ ॥ पार्था सृष्टीमाजीं पाहतां जाण । थोर विघ्नें भूतें दारुण । राजस तामस प्रगटोन । म्हणती आम्हीच देव ॥ १२ ॥ करोनि मूर्तीचा आकारू । तेथें करिती अनाचारु । म्हणती हाच सर्वेश्वरु । सर्वां भूतीं प्रगटला ॥ १३ ॥ मारिती पशूंच्या दावणी । आचार सांडिला ब्राह्मणीं । तुळसीमाळा सांडुनी । गळां घालिती दर्शनें

॥ १४ ॥ सोमवारासारिखें व्रत । तें टाकूनि भ्रांत ।
एकादशी न करित । घालिती गोंधळ ॥ १५ ॥ करूनि
आला काशी । स्नान केलें भागीरथीसीं । गृहीं येऊनि
आश्विनमासीं । करिती शक्तिपूजा ॥ १६ ॥ गंगा-
त्र्यंबकतटाकीं । तीर्थें केलीं एकीं । गांवासी येऊनि
शेखीं । जाती मल्हारी दर्शना ॥ १७ ॥ सकळ यात्रा
करूनि । हिमाचळाप्रति जाऊनि । कंठीं वाहे मायराणी ।
त्यासी कोणीं उद्धरावें ॥ १८ ॥ विभूति चर्चूनि ललाटीं ।
रुद्राक्षमाळा घालूनि कंठीं । हातीं घेऊनि दिवटी ।

जाय गोंधळासी ॥ १९ ॥ ऐसे सर्व जन भुलले । हिंसें
ज्ञान लोपलें । मज नोळखतां गेले । यमापाशीं ॥ २० ॥
जंव सुखी असे बरवा । तंव मांडी भूताची सेवा ।
अडलिया म्हणे धांव गा देवा । पाव पाव ॥ २१ ॥
तरी याकारणें पूर्वींच । माझें स्मरण करीं साच । येर
बापुडे अर्वाच । जन सकळ ॥ २२ ॥ मी आत्माराम
परिपूर्ण । मजवीण तारिता कोण । मजवांचूनि आणि-
काचें स्मरण । न करीं पार्था ॥ २३ ॥ माझें स्वरूप अवि-
नाश । न कळे न लक्षवे कवणास । ध्वनी गर्जत आकाश ।

ते ओळखी माझी ॥ २४ ॥ मी दृष्टी करीन वांकुडी । तरी पाडीन ब्रह्मांडाची उतरडी । तेथें या देवांची प्रौढी । काय करावी ॥ २५ ॥ मी अमृतदृष्टीं पाहे । तरी सकळ जीवंत होय । परी नेणती माझी सोय । अज्ञान पाखंडी ॥२६॥ हा सकळ मायेचा विस्तार । तिणें रचिलें चराचर । परी माझे हातीं सूत्र । मी खेळवीतसे ॥ २७ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ २८ ॥ इति ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः । यावरी बोले अर्जुन । तुम्हीं
सांगितलें आत्मज्ञान । कळलें आत्मसाधन । आणिक
पुसेन ते सांगावें ॥ १ ॥ तूं न सांपडसी योगावीण ।
नाहीं संदेहप्रमाण । तरी अविनाशस्वरूप निर्वाण । तें
मज सांग देवा ॥ २ ॥ देव म्हणे भक्तराया । माझ्या
अनंत माया । त्या सुचिता धनंजया । न कळे स्वरूप
माझें ॥ ३ ॥ माझी माया अनिवार जाण । द्वादश
सूर्यांचें प्रकाशन । तिचे तरळती नयन । माझें स्वरूप
न्याहाळितां ॥ ४ ॥ त्या मायेच्या कंठीं । ब्रह्मांडगोलकांची

गांठी । तेही शक्ती होय हिंपुटी । मज देखावया
॥५॥ त्या मायेच्या नेत्रज्वाळें । जळतीं ब्रह्मांडें सकळें ।
तियेचे झांकती डोळे । माझें स्वरूप पाहतां ॥ ६ ॥
सकळ मायेचे करीं । ते माया एकवीस स्वर्गांहूनि
थोरी । ते न पवे पोटभरी । माझिया स्वरूपाची ॥ ७ ॥
यावरी म्हणे पार्थवीर । तुझिये मायेचा न कळे निर्धार ।
जेथें न पविजे पार । तेथें म्यां काय करावें ॥ ८ ॥ तंव
म्हणे वनमाळी । जे मज न विसरती कदाकाळीं । मी
तयांचे हृदयकमळीं । संचरतसें ॥ ९ ॥ पार्थ म्हणे

अंतकाळीं। नाडी गात्रें चळतीं सकळीं। भुली अंधकार नेत्रकमळीं । श्रवणीं ना ऐकवे ॥ १० ॥ तेव्हां वाचा खुंटेल। जिव्हेसी कष्ट होतील। तों कैसें स्मरण करील। तये वेळीं ॥ ११ ॥ देव म्हणे पार्थवीरा। ज्या प्राणियांसी आत्मभुली अपारा। जे भुलोनि गेले संसारा। त्यांसी अंतीं भुली ॥ १२ ॥ माझ्या नेणती नामदर्शना। माझा आचार नावडे मना। कदाकाळीं मज आठवीना। त्यासी यातना ऐशा होती ॥ १३ ॥ जो मज न विसंबे कदाही। त्यासी हा जाच नाहीं। अर्जुन म्हणे

जे देवद्रोही । त्यांसी अंतीं गति कैसी ॥ १४ ॥ यमदूत
येती तया न्यावया । ज्याच्या हृदयीं मी नाहीं धनंजया ।
यमपुरी त्या पापिया । म्यां केली असे ॥ १५ ॥
कुंभीपाक कल्हेचा डेरा । जीव घालिती तया भीतरा ।
तळीं अग्नि असे सैरा । वरी झांकण ठेविती ॥ १६ ॥
तेथें वृक्ष वाढिन्नले । त्यांचीं पत्रें जैसे भाले । तयांवरी
जीव टाकिले । ते झाले शतचूर्ण ॥ १७ ॥ मागुती
घालिती ताम्रभूमीवरी । ती तापली असे धरित्री ।
बांधूनि चालविती शरीरीं । चालतां जळती पाय ॥ १८ ॥

त्या यमदूतांचें स्वरूप कैसें । पार्था सांगतां विभ्रंशे । सर्प कावळे मिषें । झाले असती ॥ १९ ॥ मांस खाती कावळे । चोंचीनें फोडिती डोळे । कोल्हे तोडिती मांसगोळे । परी त्यांसी करुणा नाहीं सर्वथा ॥ २० ॥ त्या जीवा सोडवीता । मजवीण नाहीं सर्वथा । म्हणोनि सर्वकाळ पांडुसुता । स्मरावें मज ॥ २१ ॥ भोगणें खाणें निद्रा करणें । सुखदुःख मजाचि समर्पणें । मजवांचून आणिक नेणें । त्यासी यातना नाहीं ॥ २२ ॥ तो मज स्मरे वेळोवेळां । तरी मी नव्हें त्यावेगळा ।

म्हणोनि मज गोपाळा । नित्य ध्यायिजे ॥ २३ ॥ माझा भक्त देखोनियां । यमदूत जाती सांडूनियां । त्यासी मी विमानीं बैसवूनियां । आपणा पैं नेतसें ॥ २४ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ २५ ॥ इति अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

***********

श्रीगोपालकृष्णाय नमः । पार्था म्यां जग व्यापिलें । मजविण नाहीं रचिलें । मी नाहीं ऐसें वहिलें ॥

निवडूनि सांग ॥१॥ सूर्य असे गगनीं । परी उजेड सर्व भुवनीं ॥ शून्य ठाव मजवांचुनी । नाहीं पार्था ॥ २ ॥ वायु असे सकळां ठायीं । परी नातळे कवणासही ॥ असोनियां देहीं । परी अलिप्त असे ॥ ३ ॥ तसा मी सर्वां घटीं । आणि स्वर्गाच्या शेवटीं । पापपुण्य पाहें दृष्टीं । परी मी भोक्ता नव्हें ॥ ४ ॥ मी सुखदुःखावेगळा । पापपुण्यानिराळा । परी दंड मजवेगळा । कवण करी ॥५॥ भक्तयोगी ब्रह्मज्ञानी । जे अखंड माझे स्मरणीं । ते माझे प्राण जनीं । ऐसें जाण पार्था ॥ ६ ॥ सर्व माझी

माया धनंजया । व्यापारी इच्छा माझी माया । शेवटीं संहारावया । इच्छा माझी ॥ ७ ॥ म्हणोनि मजचि ध्यावें । सकळ मजभीतरी पहावें । मजवांचूनि नाठवावें । ज्यासी पाहिजे माझें सुख ॥ ८ ॥ ऐसे जयांचे जन्म गेले । ते माझे स्वरूपीं मिळाले । दोंही पक्षीं उद्धरिले । भक्त माझे म्हणोनि ॥९॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ १० ॥ इति राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगोपालकृष्णाय नमः। यावरी अर्जुनें आक्षेपिलें। जी त्वां सर्व व्यापिलें। व्यापूनियां निराळें। तें मज सांग देवा ॥१॥ तंव म्हणे सर्वेश्वर। तुझा फेडीन अंधकार। न सांगतां धीर। न वाटे तुज ॥ २ ॥ तुवां पुसिलें विचक्षणा। ते मी तुज सांगेन आत्मखुणा। तें गौप्य करीं रे अर्जुना। सांगेन तुज ॥ ३ ॥ पूर्वी ऐसाच ज्ञानकथनीं। प्रश्न केला आदित्यांनीं। हेंचि ज्ञान सूर्यांनीं। मजपासूनि घेतलें ॥ ४ ॥ यावरी म्हणे अर्जुन। सूर्य तरी आदिपासून। तूं द्वापारींचा श्रीकृष्ण। त्यासी

प्रश्न कोठें सांगितला ॥ ५ ॥ देव म्हणे धनंजया । मी युगायुगीं संभवें राया । भक्तांसी उद्धरावया । स्थापावया धर्मासी ॥६॥ दुष्ट राक्षसांचा नाश । मीच करितों हृषीकेश । सकळां ठायीं माझा वास । मी व्यापूनि असें ॥ ७ ॥ पार्थ म्हणे जरी तूं व्यापक । सर्वां ठायीं संचरसी एक । तरी कवण कैसा विवेक । ओळखी दावीं देवा ॥ ८ ॥ ऐकें पार्था विचक्षणा । ह्या माझ्या ओळखें खुणा । देवांमाजीं इंद्रराणा । गुरूमाजी बृहस्पती ॥९॥ कुंजरांमाजीं ऐरावत । अश्वांत उच्चैःश्रवा

सुजात । अप्सरांमाजीं रंभा नृत्यवंत । ह्या विभूति माझिया ॥१०॥ स्त्रियांत लक्ष्मी उत्तम । गौमाजीं कामधेनु परम । धनुर्धरांमाजीं श्रीराम । वेदांमाजीं सामवेद ॥ ११ ॥ भांडारियांत कुबेर । रुद्रांमाजीं शंकर । भक्तांमाजी प्रल्हाद थोर । ह्या विभूति माझिया ॥१२॥ पांडवांमाजीं धनुर्धरु । यादवांमाजीं नंदकुमरु । पर्वतांमाजीं मेरु । सागरांमध्यें क्षीराब्धि ॥ १३ ॥ तेजांमाजीं सूर्य जाण । तारागणांत चंद्र आपण । योगांत संन्यासलक्षण । छंदांमाजीं गायत्री ॥ १४ ॥ नद्यांमाजीं

गंगा । सर्पांत वासुकी पैं गा । पाषाणांत परीस वेगा ।
ओळखें विभूति माझिया ॥१५॥ तृणांमाजीं दर्भ एक ।
वाद्यांमाजीं घंटानाद देख । रागांमाजीं श्रीराग
ओळख । जाण गा पार्था ॥१६॥ वृक्षांमाजीं पिंपळ थोर ।
मासांत मार्गेश्वर । श्वापदांत सिंह थोर । मृगांत
कस्तूरीमृग ॥ १७ ॥ पक्षियांत गरुड थोर । भोजनांत
घृत सार । कपिल महामुनीश्वर । देवऋषींमाजीं नारद
॥ १८ ॥ पार्था इंद्रियांमाजीं मन । अग्नींत जठराग्न ।
चहूं वर्णांत ब्राह्मण । ह्या विभूति माझिया ॥ १९ ॥

व्यापारांत दंड माझा । मनुष्यांमाजीं राजा । शस्त्रांत सुदर्शन चक्र ओजा । ह्या त्रिभूती माझिया ॥ २० ॥ धातूंमाजीं हेम सुंदर । खाडियांमाजीं हिरा थोर । नादांमाजीं मधुर । शंखनाद् ॥ २१ ॥ ज्ञानांमाजीं ब्रह्मज्ञान । जागरणांत हरिकीर्तन । भक्तांमाजीं पार्थ जाण । भक्तींमाजीं पितृभक्ति ॥ २२ ॥ यावरी विश्व व्यापूनि । सर्वांठायीं संचरोनि । शून्य ठाव मजवांचोनी । दाखवीं पार्था ॥२३॥ ऐसा मी विश्वरूपक । सर्वां घटीं व्यापक । मी सकळांसी काळांतक । सकळ माझे

ठायीं ॥२४॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता ।
प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥२५॥ इति
विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

************

श्रीगोपालकृष्णाय नमः । मग घालोनि लोटांगण ॥
वंदिले श्रीकृष्णाचे चरण । विनवी कर जोडून । सकोमळ
उत्तरीं ॥ १ ॥ म्हणे देवा तूं सर्वगत । व्यापक तूं अनंत ।
व्यापूनियां सर्व लोकांत । शेखीं निजरूप वेगळें ॥२॥
जगत्रय हें तुझिया चरणीं । तूं विस्तरलासी त्रिभुवनीं ।

शून्य ठाव तुजवांचोनी । एकही न दिसे ॥ ३ ॥ तूं परिपूर्ण विश्वंभरु । सकळही तुझा विस्तारु । देवा तूंचि परात्परु । दाता त्रिभुवनींचा ॥ ४ ॥ तरी तें निजरूप लपविलें । मायारूपें जग व्यापिलें । जें रूप नाहीं कळलें । ब्रह्मादि सुरवरां ॥ ५ ॥ तें दाखवीं मजला । म्हणोनि चरणांसी लागला । मग देवो बोलिला ॥ हांसोनियां ॥ ६ ॥ अरे सखया अर्जुना । माझें स्वरूप न कळे कवणा । मी सकळ देवांच्या अनुमाना । नाहीं आलों ॥७॥ मी अगाध चक्रवर्ती । सकळांसी घालोनि

मायाभ्रांतीं । पाहें पां माझिया शक्ती । त्याही भुल-
लिया ॥८॥ त्या माझें विश्वरूप वर्णितां । श्रम आला
शेषा स्तवितां । दुखंड जिव्हा जाहल्या तत्त्वतां । परी
गणितां नयेचि ॥९॥ ऐसें माझें स्वरूप । अगाध आणि
अमूप । तें सांगेन निष्पाप । आनंदमय ॥ १० ॥ तें
पर्येसीं अर्जुना । सावध होईं पंचानना । दाखवूं
विश्वरूपप्रगटना । पाहें पां तूं ॥ ११ ॥ तंव श्रीकृष्णमूर्ति
हरपली । एकसरी दीप्ति प्रगटली । नेत्रीं झांपड पडियेली ।
झांकोळली दृष्टि देखा ॥ १२ ॥ जंव पाहे गगनीं । तंव

प्रचंड ज्वाला वदनीं। सूर्य लोपला नयनीं। जिव्हा प्रचंड विजू ॥ १३ ॥ देखोनियां भयभीत झाला । पार्थ तेजें कोंदाटला । महाकंप सुटला । उठले रोमांच ॥ १४ ॥ न देखवे दिव्यरूप सर्वथा । म्हणोनि पडला पालथा । देव म्हणे गा पार्था । पाहें स्वरूप माझें ॥१५॥ येरू म्हणे भुललों जी देवा । कैसा प्रकाश म्यां पहावा । देव म्हणे पार्थिवा । दिव्य दृष्टि देईन तुज ॥१६॥ प्राकृत दृष्टीनें न पाहें मज । म्हणोनि दिव्य दृष्टी दिधली तुज । आतां पाहें दिव्य तेज । भिऊं नको ॥ १७ ॥ मग

उठला अर्जुन । पाहे नेत्र उघडून । गगनीं प्रकाश दारुण । अद्भुत देखिला ॥१८॥ कोटि सूर्य धगधगीत । नेत्र भवंडी अनंत । मुखांसी नाहीं गणित । उग्र भयासुर ॥१९॥ अनंत कर श्रवण । अनंत आयुधें दारुण । तुकितां देखिला तेजोभान । गदापरशु मुद्गर ॥२०॥ चक्र त्रिशूल लहुडी । धनुष्य बाण चंड कुऱ्हाडी । भाले हातीं अंकुश प्रौढी । झेलितां देखिला ॥२१॥ मुखांतुनी निघती ज्वाळा । जिव्हा दिसे झळझळा । अनंत कंठीं रुंडमाळा । मुगुट दिसती नानाविध ॥२२॥ जटापिंगट बाबरझोटा

शंख शिंगिया संगति घंटा। ऐसा झाला प्रगट मोठा। दिव्य तेजेंसीं ॥२३॥ देव म्हणे गा पार्थवीरा। कोण कोठें आहे तें धनुर्धरा। सकळ स्वरूप सविस्तरा। आणिक पाहें भक्तराया ॥२४॥ अर्जुन पाहे न्याहाळुनी तंव सकळ सृष्टी नाभिस्थानीं। मेरु असे श्रवणीं। नेत्रीं सप्त सागर ॥२५॥ चरणीं सकळ तीर्थांची खाणी। दुष्ट राक्षस वदनीं। ते अग्नीचे अहाळेंकरूनि। जीर्ण झाले देखा ॥ २६ ॥ भक्तऋषि भाग्यवंत। कंठीं मुगुटीं आनंदभरित। देव द्विज महंत। हृदयीं नांदती

॥ २७ ॥ मग म्हणे देवांचे राणा । मुखामध्यें पाहें रे
अर्जुना । तंव देखिलें जाणा । अपर मातापितरां हो
॥ २८ ॥ आतां पार्था दुर्योधन पाहें । तंव तो दाढेअग्रीं
आहे । माझिया मुखाची सोये । जीर्ण केलें सकळिकां
॥ २९ ॥ जे पाहतसे अर्जुन । ते झाले असती जीर्ण
कटीं पांडवसैन्य । आहे देवा ॥ ३० ॥ आणिक देखे
नेत्रकमळीं । महाभक्त जोडूनि अंजुली । तुज ध्याती
सर्वकाळीं । ऐसें देखतसें ॥ ३१ ॥ सकळ स्वरूप देखिलें
अंगीं रोमांच उठिले । नेत्रीं जळ प्रगटलें । आनंदाश्रु

॥ ३२ ॥ म्हणे या स्वरूपाची गणना । न कळे वेदशास्त्र पूराणां । उद्धरलों जी जगज्जीवना । आतां शांत होआवें ॥ ३३ ॥ देवा या स्वरूपाचें तेज । न माये गगनीं दिव्य निज । कोटिसूर्य सहज । एक वेळ प्रगटले ॥ ३४ ॥ तरी एवढें आश्चर्य देखिलें । हृदय आनंदें उचंबळलें । या स्वरूपाचें नांव नाहीं कळलें । तें मज सांग देवा ॥ ३५ ॥ पार्था पुनरपि पाहें मातें । मग आठविसी कवणातें । शंकूं नको विश्वरूपातें । तृप्तीपर्यंत पाहें ॥ ३६ ॥ पार्थ पाहे न्याहाळूनि । तंव उंच

एकवीस स्वर्गांहुनी । सप्त पाताळें चरणीं । अष्टदिशा प्रकाश ॥ ३७ ॥ ऐसीं रूपें उदंड अपारें । एक बीभत्स एक सुंदरें । एक गर्जती एकसरें । नापरी देखिलीं ॥ ३८ ॥ एकाकंठीं रुंडमाळा । वैजयंती एकाच्या गळां । मत्स्य कूर्म वराह सकळां । तेथेंचि देखतसे ॥ ३९ ॥ नरसिंह वामन परशुराम । राघव आणि मेघश्याम । बौद्ध कलंकी अनुपम । सकळ स्वरूपें देखिलीं ॥ ४० ॥ हरिहर ब्रह्मादिक । स्वरूपीं दिसती अनेक । आणि देवांचा नायक । इंद्रराजा ॥ ४१ ॥ अग्नि वायु कुबेर ।

यमधर्म विघ्नहर । हे दिसताति विचित्र । स्वरूपामाजीं ॥ ४२ ॥ पापपुण्य गहन । अर्जुनें देखिला पापदहन । पार्थ म्हणे सान सान । होईं देवराया ॥ ४३ ॥ पुनरपि लागला चरणा । म्हणे सान होईं जगज्जीवना । या स्वरूपाचें नांव सांगा ना । म्यां जपावें कवणासी ॥ ४४ ॥ देव म्हणे सखया प्राणा । अक्षय काळ नांव जाणा । दुष्टजनविध्वंसना । या स्वरूपाचें ॥४५ ॥ विश्वरूप दुसरें नांव । हें सात्त्विक ध्याती जीवें भावें । जेथें माझ्यांचा गांव । तेथें धांव जाय माझी

॥ ४६ ॥ मी अखंड ज्याचे हृदयीं । त्यावेगळा कोठें नाहीं । रात्रंदिवस पाहीं । त्याची चिंता मज ॥ ४७ ॥ जे मज सर्वस्वें वेंचले । ते म्यां कंठीं धरिले । दुष्ट राक्षस घातले । काळाचे मुखीं ॥४८॥ अहो जी देवा प्रत्यया आलें । पुनरपि दंडवत घातलें । सान होईं जी वहिलें । मज भय वाटतसे ॥४९॥ मग विश्वरूप हरपलें सांवळ्या श्रीकृष्णातें देखिलें । मग चरण वंदिले । अर्जुनें देवाचें ॥ ५० ॥ म्हणे धालों जी निवालों । दोंही पक्षीं उद्धरलों । मी सलगीनें बोलिलों । तें क्षमा

कीजे दातारा ॥५१॥ मागें अपराध केले । आणिक हांसतां जें जें बोलिलें । तें क्षमा करा जी वहिलें । म्हणोनि घातलें दंडवत ॥ ५२ ॥ ऐसा विनविला देवाधिदेवो । अर्जुनाचा फिटला संदेहो । म्हणे हे सकळ तुझी मावो । मारिसी आणि मारविसी ॥५३॥ मी काय बापुडें । जें मी मारीन तुजपुढें । हें अज्ञान रोकडें । फेडिलें माझें ॥५४॥ पुढती केला नमस्कारु । कृतार्थ झालों जी थोरु । फेडिला अज्ञानअंधकारु । ज्ञानांकुर प्रगटला ॥५५॥ आनंदें लागला चरणा । स्वरूप आठवी

पुनःपुन्हा । पुनरपि करी स्तवना । म्हणे ज्ञानदेव ॥५६॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥५७॥ इति विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥११॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

************

श्रीकृष्णाय नमः । मग अर्जुनें घातलें दंडवत । उठवोनि कृष्ण आसवें पुसित । अष्टांग आश्वासीत । देव म्हणे आणिक सांगेन ॥१॥ जे मज हृदयीं ध्याती । माझ्या स्मरणेंवीण दिवस वायां जाऊं न देती । वाचा

उच्छिष्ट न करिती । अन्य भजनीं ॥२॥ ऐसे जे भक्त जाण । ते माझे जीव प्राण । मजही तयांवांचून । आणिकाची चाड नाहीं ॥ ३ ॥ जो धर्म करावा । तो मजचि समर्पावा । भोगही वायां जाऊं न द्यावा । म्हणावें कृष्णार्पण ॥ ४ ॥ निंदा द्वेष न करीं । सांडीं शास्त्रांची भरोवरी । जेथें मी नाहीं श्रीहरी । ते कथा परीसूं नको ॥५॥ हा जन्म गा कुरवंडी । मज करूनियां सांडीं । तरी मी जाण दंडीं । तुझिया पापातें ॥६॥ ऐसा योग करिजे । तरीच माझें स्वरूप पाविजे । प्रेमसुख

भोगिजे । येणें आकारें ॥७॥ इति श्रीभगवद्गीता । व्यास
देव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ।
इति भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

*********

श्रीकृष्णाय नमः । मग म्हणे अर्जुन । हा देह वागविता कोण । हे भुली अज्ञान । निरसली नाहीं ॥ १ ॥ देव म्हणे मागें सांगितलें । तें त्वां नाहीं परिसिलें । तरी आतां पुशिलें । तें मी सांगेन ॥ २ ॥ सूत्रधारी सूत्र धरी । बाहुली नाचवी सभेभीतरी । तो काय सूत्राची दोरी । कळूं देतसे ॥ ३ ॥ तैसा मी सूत्रातें धरोनि । माझी माया खेळवी जीवांलागोनि । मी वेगळा विंदानीं । परी सूत्र न सोडीं ॥ ४ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण

आतां। म्हणे ज्ञानदेव ॥ ५ ॥ इतिक्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ।

*********

श्रीगोपालकृष्णाय नमः । अर्जुन म्हणे जनार्दन । हे उत्पत्ति करीतसे कवण । सर्व सूत्र तुजपासून । तरी सुख दुःख कां पावती ॥ १ ॥ मग म्हणे जगज्जीवन । अर्जुना परियेसीं चित्त देऊन । माझी उत्पत्ति त्रिगुण । परि तूं गोप्य करीं ॥१२॥ माया योनि जाण । ब्रह्मा प्रजापति म्हण । तिसरें बीज मजपासोन ।

बीजदाता मीच पार्था ॥ ३ ॥ सत्त्वें उत्तम संपूर्ण सुख ।
राजसें राज्यसुख देख । तामस भोगवी नाना दुःख ।
या परीचें जाण पार्था ॥ ४ ॥ देहीं बीज मी संचरवीं ।
आत्मा घालोनि वाढवीं । अंतकाळीं सोडवीं । मीच
पार्था ॥ ५ ॥ देहीं असतां जीवातें । सप्तमास होतां
त्यातें । आठवीतसे मातें । स्मरण ध्यानीं ॥ ६ ॥
मग उपजलियावरी । अंगीं लागे वायु धरित्री ।
मग पडे अवघीच विसरी । सोहंशब्दाची ॥ ७ ॥
सोहंशब्द विसरला । कोहंशब्द याचा विकासला ।

तो मायेनें भुलला । विसरला चारी जन्म ॥८॥ तीन जन्म आठवी शरीरीं । तेणें दुःखें स्तनपान न करी । आठवीतसे अंतरीं । मागील दुःख ॥९॥ जंव मायबापातें ओळखे । तंव आठवी तीन जन्मांचीं दुःखें । मग एकाचि असे देखे । मागील कांहीं सुचेना ॥ १० ॥ नावेक होय खेळकरु । मग पडे अवघाच विसरु । शेवटीं आपपरुं । ओळखूं लागे ॥ ११ ॥ बाळपणीं अज्ञान । तारुण्यामाजीं मदन । हीं गेलीं वृथा जाण । मग वृद्धपण पावला ॥ १२ ॥ न विचारतां पाप

केलें । जाणोनि तारुण्यपणीं घडलें । सर्वस्व हारपलें । मग करी धांवाधांवी ॥ १३ ॥ सकळ गेलें बळ । कर चरण झाले विकळ । नेत्र श्रवण निढळ । पडले पार्था ॥ १४ ॥ मग म्हणे रामराम । इतकें म्हणतां येतो श्रम । त्यासी होय जन्म । पशुकुळीं ॥ १५ ॥ साधुसंगतीं लागला । माझ्या दर्शनीं भजिन्नला । सुपात्रीं देह वेंचिला । तो जन्मला श्रीमंतकुळीं ॥ १६ ॥ तामसदर्शनीं भजे । उपजतांच मज नेणिजे । हिंसा बहुत कीजे । तेणें होय दरिद्रजन्म ॥ १७ ॥ इति श्रीभगवद्गीता ।

व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ १८ ॥ इति गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ।

*********

श्रीकृष्णाय नमः । पार्थ म्हणे देवाधिदेवा । या सकळ तुझिया भावा । मागें सांगितला विभूतींचा ठेवा । ज्यां व्यापिलें म्हणोनि ॥ १ ॥ आतां सांगसी हें ज्ञान । तरी सुख दुःख तुजपासून । भोक्ता राम म्हणोन । हें सत्य कीं मिथ्या ॥ २ ॥ अरे मी हुताशनरूप असें । कीं

ब्राह्मणाचे मुखीं वेद वसे । आणिक पार्था परियेसें ।
गोमुखीं जाण पां ॥ ३ ॥ कीं संन्यासी सज्ञानी । निराश्रमी
महामुनि ॥ त्यांचे ठायीं भजनीं दानीं । मीच भोक्ता ।
॥ ४ ॥ पार्थ म्हणे जी समर्था । दुबळें कैसें कीजे आतां ।
त्यासी धर्मनीतिवार्ता । काय करावी ॥ ५ ॥ देव म्हणे
ज्यासी इतुकें न ठाके । तरी माझें भजन करी
सात्त्विकें ॥ ब्राह्मणा देईजे वेदमुखें ॥ तेणें मी तृप्त असें
॥ ६ ॥ इतुकें न ठाके ज्यासी । तरी ग्रास देईं अग्नीसी ।
त्याचे मुखेंसीं । मी तृप्त असें ॥ ७ ॥ इति श्रीभगवद्गीता ।

व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥८॥ इति पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

********

श्रीकृष्णाय नमः । यावरी धनुर्धरें विनविलें । देवा तुज म्यां पुसिलें । तें त्वां सांगितलें । तरी भय सुटलें मज ॥ १ ॥ देवा तूं सावधान । सर्व सूत्र तुजपासून । तरी अधोगति कवण । आणि मरण वोखटें ॥ २ ॥ यावरी बोले भक्तवत्सल । ऐक भक्ता निर्मळ । माझे स्मरणीं प्रबळ । दक्ष होय ॥ ३ ॥ अरे आत्मा अमर जाण ।

त्यासी कैंचें मरण । तो अच्छेद्य अभेद्य अभिन्न । नित्य स्थानवंत ॥ ४ ॥ जैसीं जीर्ण वस्त्रें सांडिजेती । नवीं प्रावरणें करिती । तैसी या प्रपंचाची उत्पत्ती । येतां जातां परियेसीं ॥ ५ ॥ मजवीण जो झाला । मज नोळखतां गेला । तो अधोगति पावला । म्हणोनियां न पावे मातें ॥ ६ ॥ अहो जी जगत्रयजीवना । हा प्रपंच सांडिला जनार्दना । तरी आत्मया आश्रय कवणा । कीं भ्रमण वायुऐसें ॥ ७ ॥ देव म्हणे सखया पार्था । या स्थळदेहीं वर्ततां । हा पडलिया दशदिशांता ।

तो भोंवता भोंवे ॥ ८ ॥ सूक्ष्म देहीं राहे । तेणें
स्वर्ग पाहे । सुख दुःख भोगिताहे । याच देहामाजीं
॥ ९ ॥ जैसी जोडी जोडिली । तैसीं फळें दीधलीं ।
मोक्षाची जोडी आली । तरी तालिंगदेह फिटे ॥ १० ॥
मजवांचूनि आन नाहीं देखिला । त्यासी मोक्ष प्राप्त
झाला । ज्यासी दुजा ठाव सुचला । त्यासी जन्म
मागुता ॥ ११ ॥ यालागीं वेदशास्त्रपुराणें । म्यां रचिलीं
असतीं जाण । मजवांचोनि अज्ञान । त्यांसी मरण
दुःखाचें ॥ १२ ॥ एक एक रोमाचे ठायीं । शत विंचूंचें

दुःख पाहीं । सांगतां न ये कांहीं । बैसलीं नवही द्वारें
॥ १३ ॥ ज्यासी भूतहिंसा घडली । भूतकृपा नाहीं
वसिन्नली । साधूची निंदा केली । त्यासी ऐसें मरण
॥१४॥ नाहीं ब्रह्म कळलें । नाहीं पितृभक्तीं भजिन्नलें ।
स्मरण नाहीं घडलें । त्यासी अंतकाळीं ॥ १५ ॥ जो
सर्वकाळ माझे ध्यानीं । आठवी शयनीं आणि
भोजनीं । अंतकाळीं तयालागूनी । मी कां भोगवीन
॥ १६ ॥ जरी न कळे माझें ज्ञान । तरी न सांडावें माझें
स्मरण । माझ्या स्मरणें ज्ञान । होय तया ॥१७॥ जो

माझिये भक्तीसी तत्पर । तयासी रक्षीं मी सर्वेश्वर ।
तारीन भवसागर । भक्त माझा म्हणोनि ॥ १८ ॥
यालागीं रचिले वेद । तेथें माझे बोलिले भक्तिभेद ।
परी त्या वेदांसी अगाध । कळलोंचि नाहीं ॥ १९ ॥
माझिया भक्तांची निंदा करिती । आणि माझी
कथा न ऐकती । ब्रह्मविद्या न ये ज्यांचे चित्तीं । ते
जाती यमपुरा ॥ २० ॥ ऐसें माझें शास्त्र पवित्र । नावडे
ज्यासी तो अपवित्र । अनामिका प्रिय हें शास्त्र ।
तो मज पवित्र सर्वथा ॥ २१ ॥ ब्राह्मण उंचवर्ण थोर ।

नाहीं माझे शास्त्रीं तत्पर । त्याचा मी पदर । लागों
नेदीं ॥ २२ ॥ इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता ।
प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ २३ ॥ इति
दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

*********

श्रीकृष्णाय नमः । अर्जुन म्हणे जनार्दन । त्रिगुणांचें
कैसें लक्षण । राजस तामस सात्त्विक गुण । विस्तारूनि
सांग देवा ॥ १ ॥ मग बोले श्रीकृष्णनाथ । हे त्रिगुण
मायेचे सत्य । ब्रह्मा रजोगुणें वर्तत । विष्णु सत्त्वगुणें

॥ २ ॥ तामसी महादेवो । यावरी पुसे धनंजयो ।
येथें कैसा अनुभवो । जाणावा देवा ॥ ३ ॥ अरे
जे सात्त्विक भजती । ते देवलोका जाती । राजसें
होती । असुर दैत्य ॥ ४ ॥ तामसें भूत पिशाचक । हें
भजन असें देख । याउपरी आणिक । सांगेन तुज
॥ ५ ॥ सात्त्विक देव तो कवण । जयासी प्रिय फळ
पुष्प जाण । राजसासी वस्त्रें दिव्यरत्न । तामसासी
हिंसावध ॥ ६ ॥ सात्त्विकासी घंटा शंख । राजसासी
ढोल दमामे मृदंग देख । तामसा कोल्हाळ बोंब । ऐसा

भेद् तयांचा ॥ ७ ॥ सात्त्विका तुळसीपत्र । राजसा
परिमळ विचित्र । तामसा कण्हेर । अशुद्ध वाहे ॥८॥
सात्त्विका मधुर भोजन । राजसा तिखट आंबट जाण ।
तामसा शिळें विटलें अन्न ॥ ऐसें भोजन तयांचें ॥९॥
सात्त्विका आसन कांबळा । राजसा पीतांबर पाटोळा ।
तामसा चर्म प्रबळा । जाण पार्था ॥ १० ॥ सात्त्विक
गुणग्राहिक । राजस तो बहुवंचक । तामस अपार
हिंसक । जाण पार्था ॥ ११ ॥ सात्त्विक हरिकथा । राजस
रामायण भारता । तामस भूतप्रेतां । वर्णिताती ॥ १२ ॥

म्हणोनि सांगतों तुज । सात्त्विक आवडे मज ।
राजस देवतां भजे । तामस भूतप्रेतां ॥ १३ ॥ सात्त्विक
माझें स्थान । राजस स्वर्गभुवन । तामस ती जाण ।
अधोगती ॥ १४ ॥ जे सात्त्विक भजती । ते
मजचि पावती । राजस जाती । इंद्रपदा ॥१५॥ तामसां
नरकप्राप्ती । कां अंतराळ अधोगती । अर्जुना सात्त्विक-
प्राप्ती । तें स्थान माझें ॥१६॥ ज्यासी सात्त्विक लक्षण ।
तो मीच असें जाण । तो मजवांचून । कोठें जाऊं
न शके ॥ १७ ॥ मी भक्तांचे ठायीं वसें । तो सात्त्विक

परियेसें । मज त्या अनारिसें । सुचूं नको ॥ १८ ॥
इति श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत
जाण आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ १९ ॥ इति श्रद्धात्रय-
विभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

********

श्रीगोपालकृष्णाय नमः । आतां मी व्यापक असें ।
सर्वांच्या हृदयीं वसें । तें व्यापकत्व परियेसें । सकळां
ठायीं ॥ १ ॥ जैसी सर्वांच्या शरीरीं । साऊली पडे
तेजावरी । ते संसर्गें न वचे दुरी । परी ते काय शरीर

होय ॥ २ ॥ जंव असे प्रकाश । तंव छायेचा सौरस । अंधकारीं परियेस । कैंची छाया ॥ ३ ॥ तैसा माझा आत्मा देहीं । मजवांचूनि न राहे कांहीं । अखंड वसे हृदयीं । आपुल्या भक्तांच्या ॥ ४ ॥ यश तें मीच जाण । जेथें अपयश तें भूत भुवन । ऐसें यश मजपासून । अपयश मात्र नव्हे पार्था ॥ ५ ॥ क्षत्रियाचे वंशीं जन्मावें । तरी समरांगणीं कां भ्यावें । स्वामिकार्जी मरावें । तरी पावावें माझें पद ॥ ६ ॥ क्षत्रियांचा धर्म ऐसा । तो पात्र नव्हे अपयशा । त्याचा आचार धर्म

ऐसा । धारातीर्थीं न्हाइजे ॥ ७ ॥ रणीं यश थोर आलें । त्याचें हृदयीं प्रेम संचरलें । हें तुज म्यां सांगितलें । आतां विसरूं नको ॥ ८ ॥ ज्यांचे ठायीं अपयश । ते सांडिती दीर्घ श्वास । त्यांचीं मुखें बीभत्स । जैसी प्रेतकळा ॥ ९ ॥ जेथें यश सोज्ज्वळ । तेथें मी संचरें गोपाळ । अपयशाठायीं माझी कळ । संचरूनि मारवीतसे ॥ १० ॥ म्हणोनि त्वां संग्राम कीजे । धनुष्यबाण घेईजे । यशाचें प्रेम लाहिजे । माझें पार्था ॥ ११ ॥ मग घातलें लोटांगण । पूर्वीं अधिक अथवा ऊण । तज

बोलिलों धाकुटपण । तो अपराध क्षमा कीजे ॥ १२ ॥
मग संतोषोनि म्हणे देवो । तुझा फेडिला संदेहो ॥
आतां करीं गा क्षयो । समस्त कौरवांचा ॥ १३ ॥ मग
घेऊनियां धनुष्यबाण । वंदिले श्रीकृष्णचरण । ऐसा
यश तुजपासून । मी अज्ञान नेणेंचि ॥ १४ ॥ ऐसा
अर्जुन प्रबोधिला । अज्ञानअंधकार निरसला ।
ज्ञानप्रकाश झाला । फिटला अहंभावो ॥ १५ ॥ अठरा
अध्याय प्राकृत । तैसें मंथोनि काढिलें नवनीत । तैसी
ही ज्ञानगीता निश्चित । परिपूर्ण झाली ॥१६॥ ज्ञानदेव

म्हणे हें गीतासार । याचा जाणिजे भेदविचार ।
त्याचा तुटेल संसार घोर । उत्तम पदा जाईल ॥१७॥
हें सर्व शास्त्रांचें बीज । सकळ पुराणांचें निज । चारी
वेदांचें भोज । हे भगवद्गीता ॥ १८ ॥ हें ब्रह्मबीज
असे । यासी भजिजे सर्वस्वें । निंदिती ते दोषें ।
देवद्रोही म्हणे ज्ञानदेवो ॥ १९ ॥ हें भगवद्गीतासार ।
जो निजभावें पठण करी निरंतर । मोक्षलक्ष्मी
निरंतर । रिघे आपेआपणचि ॥ २० ॥ जे गीता करिती
नित्य श्रवण । त्यांचीं सर्व अपयशें चुकतीं जाण ।

सदासर्वदा कल्याण । त्यांचे घरीं होय ॥२१॥ संग्रामीं
विजयी होईल । मोक्षलक्ष्मी घरीं येईल । सर्व लोकीं
जय पावेल । हें सत्य वचन भगवंताचें ॥२२॥ इति
श्रीभगवद्गीता । व्यासदेव निरूपिता । प्राकृत जाण
आतां । म्हणे ज्ञानदेव ॥ २३ ॥ इति श्रीभगवद्गीतायां
ज्ञानदेवकृतायां श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो
नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

********

# अथ श्रीविष्णुनमनस्तोत्रम् ॥



श्रीगणेशाय नमः । नमो कालकौतूहळा । नमो
चक्रचाळक गोपाळा । नमो विश्वप्रतिपाळा । प्रभंजना
॥ १ ॥ नमो शिवा शिवेशा । नमो भेदनिवासा ।
नमो रूपा अष्ट दिशा । नारायणा ॥ २ ॥ नमो
सकळ गर्भोद्भवा । नमो चित्तचाळकभावा । नमो
विश्वमूर्ते देवाधिदेवा । श्रीविठ्ठला ॥ ३ ॥ नमो भजन-
शीलव्यापका । नमो ज्योतिर्लिंगदीपका । नमो
नमो तुज एका । आत्मव्यापका जगद्गुरो ॥ ४ ॥ नमो
श्रीधरनिवासा । नमो आगम परेशा । नमो

ज्ञानगम्याधीशा । प्रतिकूळा ॥ ५ ॥ नमो स्वलीला-
विनटा । नमो स्तुतिवैकुंठपीठा । नमो रूपाधिश्रेष्ठा ।
वैकुंठींचिया ॥६॥ नमो दर्शना स्पर्शना । नमो उपराति-
निधाना । नमो तितिक्षादारुणा । कमलालया ॥ ७ ॥
नमो त्रिगुणआदटा । नमो त्रिगुणउद्भटा । नमो
सत्स्वरूपसदटा । ब्रह्मनामा ॥८॥ नमो तुज चराचरा
हरी । नमो विगळितसंहारी । नमो वाचावक्ताकारी ।
वागपुष्पी ॥९॥ नमो तमहर्ता कर्ता । नमो सकळसंहर्ता ।
नमो काळकवळु दाता । रक्षिता हरि भक्तांसी ॥१०॥

नमो हरिहरेश्वरा । नमो न देवो दुसरा । नमो
वेदांतसागरा । सर्वेश्वरा तुज नमो ॥११॥ श्रुति निरामय
नमो नमो । नमो द्वैतनिरसना नमो । ज्ञानरूपा
नमो । करिसी तूं निजकरें ॥ १२ ॥ नमो व्यक्ताव्यक्त
हरी । नमो मायासंहारकेसरी । नमो विद्येच्या
माजघरीं । नांदसी तूं आत्मराजा ॥ १३ ॥ जीव शिव
नमो तुज । ज्ञानविज्ञान तुज सहज । नमो सर्व बीज ।
तुज सहज श्रीविठ्ठला ॥ १४ ॥ लीलास्तवनप्रारंभ ।
नमो जगदादि मूलस्तंभ । उभा राहूनि स्वयंभ ।

भीमातीरीं पंढरीये ॥ १५ ॥ नमो ऐसिया रूपेशा । नमो त्रैलोक्यविस्तारठशा । नमो आदिपरेशा । जगदीशा युगादि ॥ १६ ॥ नमो पुरुषोत्तमपुरुषा । नमो सकळही उदासा । करूनि जीवरूप ठसा । नांदसी तूं चराचरीं ॥ १७ ॥ मधुसूदना तुज नमो । मधुमाधवा हृदयीं रमो । नमो मधुरगीत नमो । माजघरीं अंबेचिया ॥१८॥ त्रिविधतिमिरनाशा । परम परमानंदउल्हासा । नमो मुरारी आशा । पूर्ण करिसी श्रीहरे ॥ १९ ॥ नमो वासनाचक्रचाळी । नमो तंडवितंडवेगळी । नमो

सर्व हरली । प्रपंचरचना ॥ २० ॥ नमो श्रीधर श्रीकर । नमो सर्वसंगी विकार । नमो विकृति अविकार । हरसी नामें एका ॥ २१ ॥ नमो शांती दया क्षमा । नमो कृपाकर पुरुषोत्तमा । नमो कासवदृष्टि रामा । निष्कळंक नाथा ॥ २२ ॥ नमो द्वैविध्यच्छेदका । नमो अर्णवपाळका । नमो द्वादशार्का । शुभांशका वेदवंद्या ॥ २३ ॥ नमो चित्तचकोरहर्ता । सर्वकारण कार्यकर्ता । नमो तुज वर्णितां संतां । विवेक प्रत्यया येतसे ॥२४॥ नमो अद्वैत अनंता । नमो निर्द्वंद्व भोक्ता

नमो नित्यानित्यसरता । तुज नमो ॥ २५ ॥
नमो दुर्गतिहरणा । नमो सर्वहरणभरणा । नमो
सर्वदशानिवारणा । भयहरणा जगदीशा ॥ २६ ॥ नमो
शिवशक्तिसमलिंगा । नमो भक्षक काळवेगा । रुद्रा-
दित्या वसु पैं गा । मम सर्वांगा परमेश्वरा ॥२७॥ नमो
कृत्रिमदमना । नमो कृशकरणहरणा । नमो प्रतिपाळ-
करणा । नारायणा तुज नमो ॥२८॥ नमो इंद्रियनियंता ।
नमो दीनादित्या । नमो दानानंदा अद्वैता । सकल
वृद्धि तूंचि ॥२९॥ नमो अवधूत दत्ता । नमो अपरमित-

मिता । नमो सर्वां वरिष्ठता । तूं चाळिता हृषीकेशी ॥३०॥ नमो दृश्यदर्पदर्पा । नमो चमत्कारांगसर्पा । नमो हरणकरण पापा । नमो स्वल्पारामा कृष्णा ॥३१॥ नमो तूं त्रिविधदीक्षा । हरणकरण तूं सुक्षा । जागृतीसम सुषुक्षा । सत्यमुक्ता महाविष्णो ॥ ३२ ॥ नमो देवेश्वर मुक्ता । महामोह महाहर्ता मंदमदनियंता । नमो नारायणा ॥३३॥ स्थिर नीरपरिहारा । नमो विद्धद्वृंद-अनुकारा । नमो विवेकसागरा । महानादा ॥ ३४ ॥ नमो खदंतसदना । नभभक्षकभुवना । शुक्लांबरा

शुक्लवर्णा । दयाघना गुणानिधे ॥३५॥ मृतामृता नमो
नमो । नमो श्रुति शास्त्र नमो । नमो विगतगर्व
नमो । पद्मगर्भा अनंता ॥३६॥ नमो चिदाकाशव्याप्ता ।
चित्तसत्ता चालनसत्ता । चित्स्वरूपादिरूपिता ।
भुवनदीपा महामूर्ते ॥ ३७ ॥ नमो एक एकार्णवा ।
नमो कल्पादिगुणवैभवा । नमो सकळ हे देवा ।
अहंभाव पैं तुझा ॥ ३८ ॥ गोगोपाळ नमो नमो ।
गोविंदगुण विष्णुधर्मो । नमो चित्तचित्ताविरामो । सर्व
काळ तुझ्या चरणा ॥ ३९ ॥ ध्वज-वज्रांकुशा । ध्वज

नीलत्विषा । नीलनाभा सतीशा । श्यामांकिता ॥ ४० ॥
सुषुप्ती जे संत । नमो तुज कृत्य । असोसी जे अमित ।
मातें क्षमा करा कांहीं ॥ ४१ ॥ नमो निर्धार नियंता ।
नमो सुखरूपा दाता । नमो आलिया पदार्था ।
क्षमा करीं स्वामिया ॥ ४२ ॥ नमो चित्तविभ्रमा । नमो
धैर्याधैर्यनामा । नमो पुराणपुरुषोत्तमा । पाहें कासवदृष्टीं
॥ ४३ ॥ प्रसाददाना नमो । नमो परमपुरुषा नमो ।
ध्यानांतर गमो । तुझ्या चरणीं केशवा ॥ ४४ ॥
अग्न्यनियंता नमो । अनित्यानित्यधर्मो । वैकुंठ

गुणग्रामो । नमो नमस्ते ॥ ४५ ॥ अनादृश्य दृश्यमाना
दृशादृश्य नित्यध्याना । सुखरूप जगज्जीवना ।
नारायणा तुज नमो ॥ ४६ ॥ दीप्तादित्य अदृश्य ।
जीवनीं दिसतसे दृश्य । जीवमय हे भास । तुज नमो
स्वामी ॥ ४७ ॥ परम परब्रह्मा । आदिब्रह्म तूं रामा ।
भक्तांलागीं विश्रामा । तुज नमो स्वामी ॥४८॥ नमो नमो
एकतत्त्वा । बाह्यमुद्रा शुद्धसत्त्वा । योगारूढपरत्तत्त्वा ।
सबाह्य पावसी तुज नमो ॥ ४९ ॥ वेदादि परम
वक्ता । वेदां तूंचि कर्ता । तुजवांचोनी सर्व सत्ता ।

न देखों आणिक ॥ ५० ॥ ज्योतिर्मय रूप तुझें । सर्व तत्त्व तूं बीज । नमो तुज सहज । पुढती पुढती नमो नमो ॥५१॥ परब्रह्म परात्पर । परतत्त्व परम सार । परम गुह्य परम विचार । नारायणा तुज नमो ॥५२॥ व्दिघड विघड सुघड । जडाजड अवघड । व्दैताव्दैत जोड । कर्ता कार्य तुज नमो ॥५३॥ संख्याविरहित जीवना । असंख्यजीवपाळणा ॥ नमो तुज संजीवना । पुंडलीक-धना पांडुरंगा ॥५४॥ निर्गुणा सगुणरूपा । देवाधिदेवा तूं सोपा । तुझी झालिया कृपा । नमन बापा तुझे

चरणीं ॥ ५५ ॥नमो नमो तारका । तूं ब्रह्मनामविशेषका । नमो तुजवांचोन सखा । योगियांसी पैं नाहीं ॥ ५६ ॥ युगादि जनत्रय । युगयोग योगमाय । हे तुजपासाव होय । ऐसिया तुज नमो ॥ ५७ ॥ नमो नमो परम । नाहीं तुजसम । ऐसा परापश्यंतीनेम । वदलिया चारी ॥ ५८ ॥ चहूंमुक्तींपरता । पंचम जो निजसत्ता । षण्मार्गगुणसत्वा । ग्रास न करिसी तुज नमो ॥ ५९ ॥ विद्वद्वृंदचिद्विलासा । भानुबिंबा प्रतीप्रकाशा । नमो तेजस-तेजसा । आदिसूर्या ॥ ६० ॥ ऐसा चहूं ग्रंथींचा

क्लेश । वाउगाचि वाहे सोस । त्रिगुण तिमिर असोस । तो तूं सत्यांश तोडीं माझा ॥६१॥ साही नाहीं चक्रभ्रमें । वाहतों इंद्रियांचीं ग्रामें । अडखळोनि साहीप्रेमें । नये ऐसें करीं नमो ॥६२॥ बाध्य बाधा कर्मांचीं । सर्व सत्ता या भ्रमाची । नमन करूनियां तुमची । तुम्हां अर्पिली स्वामी ॥ ६३ ॥ यमधर्मांचिया सत्ता । कर्मधर्मांचिया पंथा । कर्मधर्म तो विधाता । ऐसा मी तो तुज अर्पिला ॥ ६४ ॥ दशमसमान । इडा पिंगला सुषुम्ना । साही चक्रें करूंन । तुझीं तुज अर्पिलीं ॥ ६५ ॥ मन

पवनयोगधारण । तुर्यासी पैं कारण । समतुकें अवघे गुण । तुझे चरणीं क्षेपिलीं ॥ ६६ ॥ हे भूत भौतिक प्रचंड । जन्मोत्पत्तीचें अखंड । जन्म युगादि ब्रह्मांड । खंड विखंड तूं जाणता ॥ ६७ ॥ प्रचुर चर्या चित्ताची । धावन वळण आकुंचनाची । सुलभ ते चमत्काराची । तेही तुज अर्पण सदा ॥ ६८ ॥ निर्वासना वासनायुक्त । गुंफलें राहिलें तेथिंचें तेथ । तेथें तूं धांवूनि अगत्य । सोडवीं वासनामय ॥ ६९ ॥ तुझिया विचारबोला । बोलीं न मिळे व्यर्थ गेला । तो मी जाऊनि संबोखिला ।

मग लागला तुझ्या पंथीं ॥ ७० ॥ नित्य धर्मांचिया
ओळी । चळल्या चुकल्या कोण चाळी । त्यासी वेद
तुझा पाळी । त्या सांभाळी परब्रह्म ॥ ७१ ॥ श्रुतिस्मृतींचीं
वचनें । सम चातुर्य परम गहन । त्यांचें अंगिकारा
मार्गस्थान । तें नारायण अंगीकारवी ॥ ७२ ॥ उदंड
विदंड वितंड । देहद्वयाचें अभंड । जें जें दिसे अंड
अंड । तें प्रचंड सांभाळीं ॥ ७३ ॥ देहभरणाची
ममता । देह पोषिती निजसत्ता । त्याहीवरील सूक्ष्मता ।
ती कृपावंता सांभाळीं ॥ ७४ ॥ तिमिर त्रिगुण

अवघे । जें जें आलें असेल ओघें । तें तें मी नेघें । सकळ वेगें सांभाळीं ॥ ७५ ॥ योनीचिया कष्टा । वरी वासना होत्या भ्रष्टा । त्या त्या करूनियां प्रविष्टा । रत झालों तुझ्या चरणीं ॥ ७६ ॥ विद्यावर्ये सानुकूळ । जन्मकर्म आचारशीळ । गेले आले विव्हळ । तूं दयाळ संभाळीं ॥ ७७ ॥ नाना जन्म अवतार । नाना शाखांचे निर्धार । नाना गोत्रउच्चार । तुझा विचार तूं जाणसी ॥ ७८ ॥ आठ वेदांचीं वचनें । शास्त्रदृष्टीं अवलोकनें । कीर्तनीं गूण वानणें । तें तें नारायणें

अंगीकारावें ॥ ७९ ॥ तवडीचें ब्रह्मांड । मी न म्हणें अंडांड । अंड करूनि विखंड । मी प्रचंड तुजसीं बोलें ॥ ८० ॥ रोमरंध्रीं अनंत ब्रह्मांडें । सकळ विराटमय खंडें । ऐसीं महद्भूतें प्रचंडें । तुझे अंगीं दातारा ॥ ८१ ॥ तूं विश्वरूपाची घडी । तारक ब्रह्मांडाची उघडी । म्यां निजदृष्टीनें चोखडी । तुझी मूर्ति न्याहाळिली ॥ ८२ ॥ ती न सुटे निजकळें । येरवीं हे नाकळे । तुझिया कृपागुणें आकळे । तुझिया दासां निजभक्तां ॥ ८३ ॥ अनंत नामांचा संकेत । मन मुरालें जेथें निर्धात । तूं

पुण्य परम अद्भुत । परमानंदा ॥ ८४ ॥ गुणाग्र गोसावी राम । गुणसमुद्र तूं आराम । सकळ भूतांचा विश्राम । तुज नमो स्वामिया ॥ ८५ ॥ नमन केलिया विभूती । चित्त रमलें झाली विश्रांती । तुज देखिलिया श्रीपती । न राहे चित्तीं तळमळ ॥ ८६ ॥ नमन हेंचि थोर दिसे । येरवीं तें साकार भासे । देखिलें तितुकें भासे नासे । नश्वर ऐसें श्रुति बोले ॥ ८७ ॥ नमन हेंचि परम । नमन हेंचि तूं वर्म । नमन हेंचि आत्माराम । करूनि घालीं ॥ ८८ ॥ नमन हाचि अनुभव । नमन हाचि

मुख्य भाव । नमन हाचि पैं देव । देवाधिदेव तूं सोपा ॥ ८९ ॥ नमन हेंचि श्रेष्ठपीठा । नेतसे तुझिया वाटा । तुजऐसा श्रेष्ठा । मग काय ह्या वाटा कराविया ॥९०॥ नमन हेंचि तारक । नमन हाचि विवेक । नमनावीण त्रिलोक । आडमार्गें रिघताति ॥ ९१ ॥ नमन लटकें नोहे नोहे । नमन भलतियासी न साहे । जैं साह्य सखा होये । श्रीगुरु निवृत्ति ॥९२॥ नमनाएवढा मंत्र । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । विचारिता क्षणमात्र । तोचि जाणे येर्थीचें ॥ ९३ ॥ नमन करी ब्रह्मा श्रेष्ठ ।

नाभिकमळीं धरी वैकुंठ । नमन करी नीळकंठ । तीर्थें मस्तकीं वंदिती ॥९४॥ इंद्र चंद्र महेंद्र थोर । नमनेंवीण नश्वर । अंडामध्यें चराचर । नमनेंवीण न तरती ॥९५॥ श्रीगुरुकृपा जें होय । तें नमनाची सोय । पावन सुगम उपाय । नमस्ते तुज नमो ॥९६॥ नमस्ते नमस्ते नमस्ते । पुढती पुढती नमस्ते । समाधिसुख आरुतें । नमो नमन करितां ॥ ९७ ॥ नमो नमो आदिपीठा । शिवादि गुणवरिष्ठा । एथें येऊन वैकुंठपीठा । समाधिशेज घातली ॥ ९८ ॥ महाविष्णु तूं योगरूपा ।

महारूपाचिया आदिरूपा । महादित्या अमुपा । कोटिसूर्या तेजसा ॥९९॥ शंखचक्रानें मंडित । करकमळ तुझें मिरवित । पदक हृदयावरी शोभत । आणि श्रीवत्सलांछन ॥१००॥ अनंत बाहूंचा मेळ । तो तूंच चतुर्भुज गोपाळ । मुगुट विराजित तेजाळ । कंठीं सूर्याहून प्रभा ॥१॥ पीतांबर माळ कंठीं । सर्वांगीं चंदनाची उटी । हिरे माणिकें कटितटीं । आणिक किरणें फांकती ॥२॥ क्षुद्रघंटिकांची ओळी । घणघणाट तयातळीं । देहुडा पाउलीं निश्चळीं । वेणु वाजविसी सुस्वरें ॥ ३ ॥

रुणझुणु रुणझुणु । ऐसा वाजविसी वेणु । तो तूं प्रत्यक्ष नारायणु । अलकापुरीं नांदसी ॥४॥ सभोंवते गोपाळ तुझे । ते अंतरंग सखे माझे । पुंडलीक तरी सहजें । प्राणसखा पैं माझा ॥ ५ ॥ ऐसा ज्ञान उद्बोध बोले । ज्ञानें अज्ञान निरसिलें । विज्ञानही हरपलें । दृश्य द्रष्टेनसीं ॥ ६ ॥ बाप रखुमादेवीवर । समाधि देऊनि स्थिर । वरी ठेवूनि अभयकर । वर देऊनि राहिला ॥ १०७ ॥ इति श्रीज्ञानेश्वरकृत श्रीविष्णुनमनस्तोत्रं संपूर्णम् ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः । गालवासी पुसती कुटीरस्थ जन । स्तवराजाचें काय पुण्य । आणि हा प्रतिष्ठिला आहे कवणें । आम्हांकारणें सांगिजे ॥ १ ॥ मग ऋषि उत्तर देत सहज । हा भीष्में प्रतिष्ठिला स्तवराज । यातें नित्य पढती जे भक्तराज । गरुडध्वज त्यांपाशीं ॥२॥ सहस्रनामाचीं आवर्तनें तीन । आणि एक स्तवराज-पारायण । तितुकें वक्तयासी घडे पुण्य । अन्यथा वचन हें नसे ॥३॥ आतां गीतेचा महिमा सुरस । तोही सांगतों तुम्हांस । श्रवण करावा सावकाश । चित्तीं

विश्वास धरूनि ॥ ४ ॥ या गीतेचीं अक्षरें । अवचित पडलीं श्रवणद्वारें । तेणेंचि दुरिता संहार । होय साचार निमिषार्धें ॥ ५ ॥ जरी नित्य पारायण नव्हे याचें । तरी दशम आणि एकादशाचें । नित्य पठण करिती जे वाचे । तरी वैकुंठ तयांचें आंदण ॥ ६ ॥ श्रीभागवताचें पुस्तक । ज्याचे घरीं असे देख । तरी तें पुण्यक्षेत्र अमोलिक । सर्वसुखदायक पैं ॥ ७ ॥ गीता भागवता ऐसें शास्त्र । त्रिभुवनीं नाहीं निश्चित । म्हणोनि अवकाश करूनि प्रपंचांत । एक श्लोक तरी वाचावा ॥ ८ ॥ नाहीं

तरी अर्ध श्लोक। नित्य प्रेमे उच्चारी भाविक। त्यापासूनि वैकुंठनायक। जाऊं न शके सर्वथा ॥ ९ ॥ यापरी आवर्तनें आणि पूजनें। सांगितलीं तुम्हांकारणें। यापरी स्तव करोनि मनें। करावें ध्यान हरीचें ॥ १० ॥ शंखचक्र–पीतांबरधारी। लीलानाटकी वैकुंठविहारी। तयासी आठवावें अंतरीं। सप्रेमभरीं होऊनि ॥ ११ ॥ अनुताप धरूनि मना। देवासी भाकावी करुणा। जय पतीतपावन जगज्जीवना। करुणाकरा श्रीहरे ॥ १२ ॥ माझिया अपराधांच्या राशी।

देवाधिदेवा तूं परियेसीं । तुजवांचूनि हृषीकेशी । पावन आम्हांसी कोण कर्ता ॥ १३ ॥ कायिक वाचिक मानसिक पाहीं । अपार दोष घडती देहीं । ते अपराध क्षमा सर्वही । करीं लवलाहीं दयाळा ॥ १४ ॥ कोणाचा आघात करावया जाण । अथवा व्यभिचारा- कारणें । या चरणांनीं केलें गमन । तें दूषण निवारीं ॥ १५ ॥ दुजयाचा करीं अंगसंग । तनूनें विषय भोगिले सांग । कां दुसऱ्यासी उपद्रव केला अंगें । तें दूषण श्रीरंगा निवारीं ॥ १६ ॥ गुह्यइंद्रियापासूनि

निश्चितीं । दोष घडले नाना रीतीं । ते क्षमा करोनि श्रीपती । पावन मजप्रती करावें ॥ १७ ॥ हातें न करितां तुझें अर्चन । नाना अकर्मीं प्रवर्तलों जाण । ते अपराध क्षमा करून । उद्धरणें पतितासी ॥ १८ ॥ तनूनें भोगिलें विषयसुख । सुगंधपरिमळ चर्चिले देख । ते क्षमा करूनि वैकुंठनायक । सप्रेम सुख मज द्यावें ॥ १९ ॥ जिव्हेनें न केली तुझी स्तुती । नाना रसीं धरली आर्ती । भूतांचे गुणदोष वर्णिले प्रीतीं । ते तूं श्रीपती क्षमा करीं ॥ २० ॥ न ऐकोनि तुझ्या

गुणानुवादा । श्रवणीं ऐकिली परनिंदा । तीं दुरितें
निवारीं गोविंदा । आनंदकंदा जगद्गुरो ॥ २१ ॥
निर्माल्याचा आमोद न घेतां जाण । उदंड सुवास
घेतला घ्राणें । ऐसा गंधविषय पूर्ण । तूं जगज्जीवन
निवारीं ॥ २२ ॥ भाळीं आवडीनें लाविले टिळे । परी
तुझें चरणारविंदीं न लोळें । ते अपराध क्षमा करोनि
सकळ । दीनदयाळ मज तारीं ॥ २३ ॥ स्थिरता न
घडेच या मना । नाना संकल्पीं धांवे वासना । ऐसें
अनंत अपराध करुणाघना । त्यांची गणना नव्हेचि

॥२४॥ पतितपावन तूं श्रीपती । पापपुण्य तुझे हातीं।
आतां तारोनि कृपामूर्ती । भजनीं प्रीती मज द्यावी।
॥२५॥ जय जय भक्तवत्सला श्रीपती । नाना पापें
घडलीं मजप्रती । ते अपराध न गणोनि चित्तीं ।
रक्षीं मजप्रति माधवा ॥२६॥ तुझी विस्मृती पडे अखंड ।
तेंचि दारुण पाप प्रचंड । तरी कृपादृष्टीं पाहोनि
निवाडें । रक्षीं मजप्रति माधवा ॥२७॥ तुझे चरणा
न धरोनि प्रीती । संसार करीं दुष्टवृत्ती । तोही अपराध
न गणोनि चित्तीं । रक्षीं मजप्रति माधवा ॥ २८ ॥

रसनाविषयीं धरोनि प्रीती । अभक्ष्य भक्षिलें नाना रीतीं । व्रत न आचरें आळसी पापमती । रक्षीं मजप्रति माधवा ॥ २९ ॥ एकादशीस भक्षिलें अन्न । द्वादशीस द्व्यभोजन । या दुरितापासूनि निर्विघ्न । रक्षीं मजप्रति माधवा ॥ ३० ॥ घातली नाहीं पितृतिथ । न पूजीले अतीत अभ्यागत । या दुरितांपासूनि निश्चित । रक्षीं मजप्रति माधवा ॥ ४१ ॥ दुराग्रहें केली गुरुनिंदा । आश्रमहीन केला धंदा । चित्तीं दुराशा वाहिली सदा । रक्षीं मजप्रति माधवा ॥ ३२ ॥ देहीं

नावरे कामबाण । घडलें बहु परदारगमन । ऐसिया दुरितांपासून । रक्षीं मजप्रति माधवा ॥ ३३ ॥ वेदाध्ययन न केलें सांग । स्वस्त्रियेचा घडला त्याग । ऐसा अनंत अपराधी मी अंगें । तूं श्रीरंग जाणसी ॥ ३४ ॥ विष्णुमूर्तीसंमुख कर जोडून । ऐसें नित्य जो करील स्तवन । त्याचें दुःख दारिद्र्य जाण । जगज्जीवन निवारी ॥ ३५ ॥ ऐसा स्तवराज नित्य पढती । अथवा चित्त देऊनि ऐकती । त्यांचे मनोरथ निश्चितीं । वैकुंठपति पुरवील ॥ ३६ ॥ आपुले स्वजन ग्रामवासी ।

तयासी सांगे गालवऋषी । म्हणे पुत्रशोक झाला वसिष्ठासि । मग विरंचीपाशीं पातला ॥ ३७ ॥ पुत्रांचें दुःख हरावया सहज । हा वसिष्ठासी सांगितला स्तवराज । म्हणे हा पढतां गुरुडध्वज । दुःख हरील जाण पां ॥३८॥ स्वस्ति श्रीकथासारामृतग्रंथे वायुपुराणसंमतो भीष्मस्तवराजः संपूर्णः ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

* * * * * * * * * * * *

श्रीगणेशाय नमः । भीष्म असतां शरपंजरीं । म्हणे अगा दयाळा श्रीहरी । प्राणी मरणाच्या अवसरीं । केवीं भवतीरीं पार पडे ॥ १ ॥ ऐकें आचार्यांची युक्ती । शतानिकातें शौनकोक्ति । धरोनि चित्तीं दृढ भक्ती । करीं अत्यासक्ती ऐकावया ॥ २ ॥ श्रीआदिनारायणाप्रती । नारदें पुसिलें स्वचित्तीं । कैसें स्मरावें तुज अंतीं । तें तत्त्व श्रीपति मज सांगे ॥ ३ ॥ श्रीनारायणें जें बोधिलें । नारदाप्रति ज्ञान झालें । जेणें मायाजाळ फिटलें । जें अनुभविलें मुनीश्वरें ॥ ४ ॥ तें मी सांगतों

तुजप्रती । सावध होईं गा स्वस्थ चित्तीं । जेणें
प्रपंचाची उपरती । होई ऐक्यवृत्ती पितामहा ॥ ५ ॥
द्वादशाक्षरी महामंत्र । उच्चारावा अति पवित्र । ध्यान
करीं एकाग्र नेत्र । लावूनि स्वतंत्र होऊनियां ॥ ६ ॥
पुरुषोत्तम विष्णु अनंत । पुंडरीकाक्ष परमाच्युत ।
स्वामी दयाळू पुराणाद्भुत । भावनायुक्त तयातें नमूं ॥७॥
शरणागतातें रक्षिता । भक्तवत्सल लोकत्राता । जनाचे
अंतरीं जाणता । सर्वांच्या प्रपितामहा नमूं ॥ ८ ॥
योगिजनांच्या एक तत्त्वा । थोराहूनि थोर महत्त्वा ।

जनीं जन्माच्या नाशकर्त्या । निर्मळ सत्त्वा आदिदेवा
॥ ९ ॥ स्पष्ट जयाचें दर्शन । शोधावया न थाके मन ।
अति सूक्ष्म पुरातन । मधुसूदना तुज नमूं ॥ १० ॥
ब्राह्मणप्रिय लोकनाथ । सरूपतेचा महापंथ । महा-
भूतांचा आदि ग्रंथ । करी चित्त संथ भक्तांचें ॥ ११ ॥
प्रणाम असो त्या भगवंता । सर्व लोक उत्पन्न करिता ।
पद्मनाभ महाबळवंता । इंद्रियनियंत्या प्रभाकरा ॥१२॥
जया जठरीं महा अनळ । भास्कराचियापरी उज्ज्वल ।
सर्व विश्वाचा आदि निर्मळ । मृत्यूचा काळ वरदाता

॥ १३ ॥ अकुंठितगति गरुडवाहना ॥ भयसंहरणा अनंतवदना । सकळ महाभूतांचिया निधाना । सृष्टितंतूच्या संधाना । तुज नमूं ॥ १४ ॥ जगद्गुरु जयापासोनि । उद्भवला असे पद्मयोनि । प्रळयीं सकळ नासोनि । जातां धनी जो एक राहे ॥ १५ ॥ चंद्र सूर्य वैश्वानरा । तारा ब्रह्मा महेश्वरा । तुझीं तीं तेजें अपारा । पापहरा पावें मज ॥ १६ ॥ पंचभूतांचें जें स्थान । योगियांचें समाधान । भक्तां देई वरदान । असो नमन तयासी ॥ १७ ॥ पर्जन्यवृष्टीचा

नियंता । जीवलोकांचा अधिष्ठाता । कर्माकर्मांचें फळ देता । गुणातीता पावें मजला ॥ १८ ॥ यज्ञाचा जो मुख्य विभागी । सर्वनिवासी रमारागी । चार वेदांचा अनुषंगी । श्यामलांगी पावें मजला ॥ १९ ॥ सकळ कर्मांचा जो साक्षी । जया शंकर ध्यानीं लक्षी । जो भक्तांसी सदा नुपेक्षी । संकटीं रक्षी अनाथातें ॥ २० ॥ हातीं गदा सुदर्शन । शोभे गरुडवाहन । विधीचें न शके ज्ञान । महिमान जाणावया ॥ २१ ॥ बीज नसतां अंड झालें । त्याहूनि जें पर बोलिलें ।

तेथेंचि योगी जे रमले । ते न पावले पुन्हा जन्मा
॥ २२ ॥ जयाची चिंता निरंतर । विष्णु ब्रह्मदेव शंकर ।
पावले निश्चयानुसार । श्रुति चार स्तव करितां ॥ २३ ॥
एकांशानें व्यापूनि सकळ । जे धराया मानस
दुर्बळ । जयां गुण पाहतां विकळ । आकाशा सफळ
तया शरण ॥ २४ ॥ स्वयें नसतां भोगी प्रकृति । परी
सर्वव्यापी ही प्रचीति । जे चंद्रसूर्यांच्या मध्यें ज्योति ।
तो रमापति संरक्षो मला ॥ २५ ॥ प्रकृतीचे गुण
अपार । त्याहीं मोजिला पांचवार । तमोगुणांत

भोगणार । सुखसागर पावो मज ॥ २६ ॥ अनेक शिरें
नेत्र वदन । असो तयासी माझें नमन । सिद्ध योगी
जयासी जाणून । ते भवा तरून पार झाले ॥ २७ ॥
मनाचा साक्षिरूप नसतां । न गवसे इंद्रियांहीं घेतां ।
परी जें अनुमान करितां । जगीं प्रगटतां सत्य भासे
॥ २८ ॥ तुजला जाणती जे नर । प्रपंचामाजीं ते चतुर ।
लोभद्वेषादि अहंकार । धरोनि घोर व्यर्थ झाले ॥२९॥
भूतें राहतीं तुझ्या पायीं । परी तूं नाहींस त्यांच्या ठायीं ।
तोचि तूं ठायीं ठायीं । दयाळा पावें मज ॥३०॥ उत्पन्न

करूनि मायायंत्र । आपण राहूनियां स्वतंत्र । जगीं जन्ममरणांचें सूत्र । स्वयें विचित्र चालवितो ॥ ३१ ॥ तूं सकळ जगाचा नियंता । किती वर्णावें तुजला आतां । देवांची तूंचि अधिदेवता । भक्तरक्षिता अवतरूनि ॥ ३२ ॥ पापपुण्यातें करविता । सत्तावंता हेतुरहिता । असो नमन दयावंता । इंद्रियातीता वारंवार ॥ ३३ ॥ पापिजनांचा समागम । हरीकृष्णा-वांचूनि नाम । लाधल्याही अनेक जन्म । कर्म सकाम न घडावें ॥ ३४ ॥ जन्मांतरींहि विषयांचा । इंद्रियांहीं

उपभोगाचा । हेतु नसावा सत्य वाचा । अभिमानाचा भाव नसो ॥ ३५ ॥ माझा येतां अंतसमय । ज्या इंद्रियाचा जो विषय । तो तुझ्या ठायीं पावो लय । देई अभय हेंचि मज ॥ ३६ ॥ तुझ्या ठायींच दृढ भाव । साधुवंशामाजीं उद्भव । ऋणावांचूनि उपजीव । वासुदेवस्मरण असो ॥ ३७ ॥ जन्मांतरींचे संचिता । याचि जन्मीं पूर्णता होतां । पुण्य पाप समानता । या इच्छिता मज देई ॥३८॥ मी तुझ्या पदाचा रंक। देवा तूं माझा नायक । ऐसा भाव दृढ एक । माझा लौकिक

रक्षावा ॥ ३९ ॥ तूं न सोडिसी सेवका । हें बोलिला वेद निका । तुझें नामचि नाविका । सद्भाविकासी ताराया ॥ ४० ॥ तुझे स्तुतीचा सागर । बुद्धीनें न लागे पार । ही विनंति वारंवार । तारी फार मी गांजलों ॥ ४१ ॥ आतां न गमे कीर्तन । तीर्थ यात्रा योगध्यान । वेदांताचेंही मनन । बुद्धिहीन मी झालों ॥ ४२ ॥ आतां सोसवेना कष्ट । म्हणोनि प्रार्थितों स्पष्ट । मी तों आहें क्रियानष्ट । बुद्धिभ्रष्ट पावें मज ॥ ४३ ॥ नाहीं तनुचा भरंवसा । कोण काळ येईल कैसा ।

कांहीं न सुचे झालों पिसा । तूं सुमनसा येई त्वरें ॥ ४४ ॥ हरिणीशीं चुकलें पाडस । शोधितां थकूनि टाकी श्वास । कीं डोळसें सोडिलें अंधास । तयां सर्व ओस भास जैसा ॥ ४५ ॥ कवणालागीं जाऊं शरण । कोण चुकवी जन्ममरण । तुजवांचूनि रमारमण । चित्तासी कोण निर्भय करी ॥ ४६ ॥ याचि प्रसंगीं घाबरलों । दैवें तुझे स्मरणीं आलों । दुजा धंदाही विसरलों । अनुसरलों तुझ्याकडे ॥ ४७ ॥ उपेक्षिसी जरी देवा । माझा दुर्बळाचा हेवा । कोण पुरवी केशवा । वासुदेवा

तुजविण ॥ ४८॥ तुम्ही अनाथांचे बंधु । दीनजना दयासिंधु । अज्ञानतमासी विधु । म्हणोनि बांधूं भक्तीनें ॥ ४९॥ देवा तुजला करोनि वंदन । अनुस्मृतीचें करिती पठण । त्यांचीं महापापें होतीं दहन । जैसा ज्वलनस्पर्शें तृणभार ॥ ५०॥ सकळ कर्मांचिया अंतीं । 'नमः' म्हणे धरोनि भक्ति । त्यासी यमदूतांच्या शक्ति । विकळ होती निरखितां ॥ ५१॥ अमावास्या आणि पौर्णिमा । ग्रहण पर्वण संक्रमा । करितां महायज्ञ होमा । घेतां नामा सुफळ होय ॥ ५२॥ अश्वमेध

सहस्र केले । तपें व्रतें योग साधिले । तेही या पदा न पावले । जेणें न येइजे पुन्हा जन्मा ॥ ५३ ॥ भाविकांची ही अनुस्मृति । पाखंडी जनांची विस्मृति । दूर करी सकळ भीति । स्मरतां भक्तीकरूनियां ॥ ५४ ॥ रक्षण करो वराह जळीं । वामननामा विषम काळीं । नारसिंह तो अरण्यस्थळीं । वनमाळी केशव सर्वदा ॥ ५५ ॥ एकवार स्मरतां हरी । तेथें होती पुण्यलहरी । मायाजाळ होऊनि दूरी । विष्णुमंदिरीं तोचि जाय ॥ ५६ ॥ म्हणोनि नारदा तुजप्रती । हें गुज

सांगितलें एकांतीं । जेणें सिद्धपदवी पावती । सदा स्मरिजे योगिजनें ॥ ५७ ॥ करता करविता वासुदेव । नित्य स्मरावा धरोनि भाव । सत्य सत्य हें गोविंद नांव । यावज्जीवमात्रीं भरियेलें ॥ ५८ ॥ शौनक म्हणे शतानिका । ही अनुस्मृति महाचंद्रिका । सर्वअज्ञानतमनाशका । भक्त भाविकांतें समर्पिली ॥ ५९ ॥ अनुस्मृतीचा भावार्थ पाहून । सखाराम जोशी करी कथन । यथामतीकरूनि समर्पण । श्रीराधारमणचरणीं असो ॥ ६० ॥ इति श्री ऐशी

अनुस्मृती । कृष्णें कथिली भीष्माप्रती । तीच प्राकृत यथामति । रमापतीसी अर्पिली ॥ ६१ ॥ इति श्रीमहाभारते शांतिपर्वणि प्राकृत अनुस्मृति संपूर्ण ।

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

********

श्रीगणेशायनमः । जय देवाधिदेवा रुक्मिणीरमणा ।
अनाथबंधो करुणाघना । मी मूढमती नारायणा ।
सकळ अज्ञानांमाजीं श्रेष्ठ ॥ १ ॥ भावहीन भक्तिहीन ।
ज्ञानहीन वैराग्यहीन । अर्चन पूजन न घडेचि जाण ।
पतित संपूर्ण सर्वांगीं ॥ २ ॥ सत्समागमाचेनि गुणें ।
नित्य होतसे भागवत श्रवण । तेणें महादुरितांचें
झालें दहन । अद्भुत ज्ञान प्रगटलें ॥ ३ ॥ याच
विषयीं इतिहास । पद्मपुराणीं बहुवस । त्यांतील
एक कथा सुरस । तुम्हां श्रोतीयांस निवेदितों ॥ ४ ॥

धर्मदत्त म्हणे विष्णुदूतांकारणें । जय विजय द्वारपाळ पुरातन । हरीचे द्वारीं असती जाण । त्यांनीं आचरण काय केलें ॥ ५ ॥ विष्णूऐसें चतुर्भुज । त्यांचें स्वरूप जाहलें सहज । आणि आपणासन्निध गरुडध्वज । ठेवी तयांसीं निजप्रीतीं ॥ ६ ॥ त्यांचा आदि सविस्तर । मज सांगा जी साचार । ऐसें पुसतां द्विजवर । ते वैकुंठविहार बोलती ॥ ७ ॥ श्रुतंबिनीची कन्या निश्चिती । तिचें नाम देवहुती । लावण्यगुणी आणि कुळवती । तिची ख्याती ऐक पां ॥ ८ ॥ कर्दम

तिचा भ्रतार जाण । त्याच्या दृष्टीच्या अवलोकनें ।
तिजला गर्भ संभवोन । पुत्र दोन जाहले ॥ ९ ॥ जय
विजय नामें दोन्ही । त्यांचीं स्त्रमुखें ठेवित जननी ।
तयां धाकुटा कपिलमुनी । देवहूतीसी जाहला ॥ १० ॥
कपिल केवळ कर्मनिष्ठ जाण । वेदशास्त्रीं असे निपुण ।
आणि जय विजय दोघेजण । विष्णुकारणें भजती
॥ ११ ॥ विष्णुशास्त्र विष्णुव्रतें । यांवीण कांहीं
नावडे त्यांतें । पूजा अर्चन यथास्थित । दोघेही
करित निजप्रेमें ॥ १२ ॥ अष्टाक्षरीमंत्र साचा । उभयतां

जप करिती त्याचा । बोलणें नाहीं अनृतवाचा । निश्चय त्यांचा या रीतीं ॥ १३ ॥ गाई ब्राह्मण विष्णुभक्तांसी । अखंड भजती सद्भावेंसीं । अपार लावूनियां तुळसी । कार्तिकव्रतासी आचरती ॥ १४ ॥ ते स्नान करोनि दोघेजण । नित्य करिती श्रीहरीचें पूजन । निश्चय देखोनि जगज्जीवन । साक्षात दर्शन दे तयांसी॥१५॥ तंव एक होता मरुत्त। त्यानें यज्ञ आरंभिला अद्भुत । मग जयविजय नेले तेथ । अतिआदरेंकरोनि ॥१६॥ त्यांसी देखोनि सकळ ब्राह्मण । करिते झाले साष्टांगनमन ।

मरुत्त आनंदला पूर्ण । म्हणे भगवज्जन भेटले ॥१७॥
देवऋषीनें निजप्रीतीनें । उभयतांचें केलें पूजन । म्हणती
हे यज्ञशास्त्रीं बहुत निपुण। संतोषलीं मनें सकळांचीं
॥ १८ ॥ मग जयासी ब्रह्मा केलें देख । धाकुटा विजय
झाला याजक। ऋत्विज ब्राह्मण होते आणिक । परी
हे मुख्य त्यांमाजीं ॥ १९ ॥ बहुत द्रव्य वांटून । सुखी
केले याचकजन । क्षुधितांसी मिष्टान्नभोजन । नित्य
नित्य घालिती ॥ २० ॥ यापरी यज्ञ सिद्धीस गेला ।
मग मरुत्त मनीं संतोषला । अवभृथस्नानासी चालिला ।

सकळदेवऋषींसहित ॥ २१ ॥ स्नान करोनियां जाण ।
तृप्त केले देवब्राह्मण । मग जयविजयासी बैसवून ।
दक्षिणा भिजवून दीधली ॥ २२ ॥ अध्वर्यूचे कष्ट
थोर । म्हणोनि त्यासी द्रव्य दिधलें फार । मरुत्तासी
पुसोनि सत्वर । उभयतां निघाले तेथोनि ॥ २३ ॥
विष्णुपूजनासी विलंब होत । म्हणोनि लवलाहें
क्रमिती पंथ । तंव जय तयासी काय बोलत । बैस
निवांत ये ठायीं ॥ २४ ॥ दोघांचें द्रव्य एक करून ।
वांटून घेऊं तत्समान । विजयासी हे गोष्ट न मानोन

मग बंधूसी वचन बोलिला ॥ २५ ॥ जें ज्याच्या
दैवें आलें जेव्हा । तो आपुलाचि विभाग भोगावा ।
दुसऱ्याचा करितां हेवा । तरी तें देवा न माने ॥ २६ ॥
विजय न करी समान वांटा । मग जयें त्यासी
शाप दिधला मोठा । म्हणे रे तूं अभिलाषी खोटा ।
तरी नाडेसावज होसील ॥ २७ ॥ विजय म्हणे रे
तूं उन्मत्त । दुसऱ्याचा हेवा धरीतोसि बहुत । तरी
वारण मदोन्मत्त । होसील निश्चित जाण पां ॥ २८ ॥
ऐसें परस्परें बोलोनि । अनर्थ केला उभयतांनीं ।

मग पस्तावलें आपुल्या मनीं । म्हणती विपरीत होऊनि
आलें कीं ॥२९॥ जयविजयांनीं करोनी स्नान । आरंभिलें
श्रीहरीचें पूजन । तों वैकुंठवासी लक्ष्मीरमण ।
साक्षात् येऊन भेटले ॥ ३० ॥ परस्परें शापिलें तत्त्वतां ।
तें देवासी सांगती उभयतां ॥ म्हणती भक्तवत्सला
अनंता । काय आतां करावें ॥ ३१ ॥ द्रव्यआशा धरोनि
फार । पुढल्या जन्माचा घेतला विचार । आतां हे विघ्न
अनिवार । तूं शार्ङ्गधर निवारीं ॥ ३२ ॥ ऐकोनि
जयविजयांची मात । तयांसी म्हणे वैकुंठनाथ । माझिया

भक्तांचें वचन असत्य। नव्हे निश्चित सर्वथा ॥ ३३ ॥ मी
प्रल्हादाच्या वचनेंकरून । स्तंभीं प्रगटलों जगज्जीवन ।
आणि अंबरिषाच्या बोलें जाण । दहा गर्भवास घेतले
॥ ३४ ॥ तुमचा शाप चुकवायासी । हें सामर्थ्य आहे
मजपाशीं । परी निजभक्तांच्या वचनासी । असत्य न
करीं सर्वथा ॥ ३५ ॥ म्हणोनि वारण नक्र पाहीं । उभयतां
व्हाल तुम्ही निश्चयीं । यासी सर्वथा संदेह नाहीं ।
शेषशायी म्हणतसे ॥ ३६ ॥ परी त्याही जन्मीं साचार ।
तुम्हांसी न पडेल माझा विसर । शेवटीं भेटोनि मी

शार्ङ्गधर । करीन उद्धार तुमचा ॥ ३७ ॥ ऐसें बोलोनियां त्वरित । अदृश्य झाले वैकुंठनाथ । जयविजयांच्या चित्तांत । समाधान वाटलें ॥ ३८ ॥ तों गंडकीनदीमाजीं विजय । नाडेसावज झाला पाहें । जय तो महावारण होय । मदोन्मत्त बलाढ्य पैं ॥ ३९ ॥ सकळ गजांचा स्वामी पूर्ण । म्हणोनि गजेंद्र म्हणती त्याजकारण । त्रिकूटाचळपर्वतींजाण । राहत होता बहुत दिवस ॥ ४० ॥ कांता पुत्र कलत्र फार । झाला तयासी परिवार । एके दिवशीं तषा फार । लागली

असतां तयासी ॥ ४१ ॥ उदकप्राशन करावयासी ।
जाता झाला गंडकीसी । तों नक्रें धरिला चरणासी ।
वैरभावासी आठवूनि ॥ ४२ ॥ दोघेही बलाढ्य समबळ ।
युद्ध होतसे तुंबळ । परी गजेंद्राचें उदकांत बळ ।
कांहीं न चले सर्वथा ॥ ४३ ॥ दिव्य सहस्रवरुषेंपर्यंत ।
उभयतां भांडती अहोरात्र । गजेंद्राची राहिली शक्त ।
उपाय तेथें चालेना ॥ ४४ ॥ पुत्रकांता कलत्र जाण ।
त्यांनीं दिधलें टाकून । मग अनुतापेंकरून । करिती
स्मरण श्रीहरीचें ॥ ४५ ॥ जय जय वैकुंठविहारा ।

पुराणपुरुषा लक्ष्मीवरा । भक्तकैवारी करुणाकरा । पाव सत्वरा ये वेळे ॥ ४६ ॥ श्रीकेशव माधव नारायणा । गोविंद विष्णु जनार्दना । वामना त्रिविक्रम मधुसूदना । दानवमर्दना श्रीरामा ॥ ४७ ॥ गरुडगमना पीतांबरधारी । मधुमुरांतका श्रीहरी । अनाथनाथा श्रीमुरारी । पाव सत्वरीं ये वेळे ॥ ४८ ॥ सकळदेवाधिदेवा । शेषशायी करुणार्णवा । तूं सकळ जीवांचा विसावा । निजभक्तठेवा तूं एक ॥ ४९ ॥ मी पीडिलों महासंकटीं । आतां सत्वर धांव जगजेठी ।

मजवरी करोनि कृपादृष्टि । उठाउठीं सोडवावें ॥ ५० ॥
ऐसी गजेंद्रें भाकितां करुणा । वैकुंठीं कळलें
जगज्जीवना । मग कळवळोनि देवराणा । सुदर्शनासी
आज्ञापी ॥ ५१ ॥ म्हणे ग्राहें धरिलें गजेंद्रासी । तुवां
शिक्षा करावी त्यासी । तों मीही मागून त्याजपाशीं ।
अतित्वरेंसी पावतों ॥ ५२ ॥ ऐसे सांगोनि त्याजप्रति ।
गरुडावर आरूढले श्रीपति । जो चतुर्भुज लक्ष्मीपति ।
शंखचक्र हातीं मंडित ॥ ५३ ॥ क्षण न लागतांचि
जाण । तेथें पातले नारायण । तों नक्रासी शिक्षा

सुदर्शनें । केली असे आधींच ॥ ५४ ॥ ग्राहासी सोडवोनि
तेंच क्षणीं । जळाबाहेर दीधला टाकूनि ।
गजेंद्रासी बैसवोनि विमानीं । वैकुंठभुवनीं चालविला
॥ ५५ ॥ नक्र हासला ते अवसरीं । म्हणे तूं पतितपावन
श्रीहरि । आणि माझा अव्हेर करूनि सत्वरीं ।
गजेंद्रासी उद्धरिलें ॥ ५६ ॥ तरी ब्रीद बांधलें असें जें
चरणीं । तें सोडोनि देईं चक्रपाणी । ऐसी ऐकोनि
नक्राची वाणी । तोही विमानीं बैसविला ॥ ५७ ॥
चतुर्भुज रूप आपल्यासारिखें । उभयतांचें केलें

वैकुंठनायकें । जयजयकार करुनि देखें । आपुल्यापाशीं ते नेले ॥ ५८ ॥ तेचि जय विजय द्वारपाळ जाण । आपुल्या सन्निध केले हरीनें । हे पुण्यशील सुशीळ दोघे जण । धर्मदत्तासी सांगती ॥ ५९ ॥ गंडकींत चक्र टाकिलें म्हणवोनि । शाळग्राम निघती तये स्थानीं । ऐकोनि विष्णुदूतांची वाणी । विस्मित मनीं द्विजवर ॥ ६० ॥ म्हणवोनि गा धर्मदत्ता । तुवां सर्वां भूतीं भजावें भगवंता । चित्तीं न धरावी अहंता । लोभममता सांडावी ॥ ६१ ॥ हेचि कथा नैमिष्यारण्यांत ।

शौनकादिकांसी सांगे सूत । तेचि सत्यभामेसी भगवंत । द्वारकेंत सांगतसे ॥ ६२ ॥ जो अनंतशायी वैकुंठविहारी । उभा राहिला भीमातीरीं । महीपति त्याच्या अभयकरीं । सप्रेम अंतरीं सर्वदा ॥ ६३ ॥

इति श्रीकथासारामृतग्रंथे पद्मपुराणसंमते गजेंद्रमोक्षः समाप्तः ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

*********

# आरती गीतेची

जयदेवी जयदेवी जय भगवद्गीते ॥ आरती ओवाळूं तुज वेदमाते ॥ ध्रु० ॥ सुखकरणी दुखहरणी जननी वेदांची ॥ अगाध तुझा महिमा नेणे विरिंची ॥ ते तूं ब्रह्मीं तल्लिन होसी ठायींची ॥ अर्जुनाचे भावे प्रगटे मुखींची ॥ जय० ॥ १ ॥ सातशतें श्लोक व्यासोक्ति सार ॥ अध्ये अष्टादश इतुका विस्तार ॥ एक अर्धपाद करितां उच्चार ॥ स्मरणमात्रें त्यांचा निरसे संसार ॥ जय० ॥ २ ॥ काय तूझा पार वर्णूं मी दीन ॥ अनन्यभावें तुज आलों मी शरण ॥ सनाथ करीं माये कृपा करून ॥ बापरखुमादेवीवरदा समान ॥ जयदेवी० ॥ ३ ॥

********

## आरती ज्ञानदेवाची

आरती ज्ञानराजा । महाकैवल्य तेजा ॥ सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ ध्रु० ॥ लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ॥ अवतार पांडुरंग ॥ नांव ठेविलें ज्ञानी ॥ आर० ॥ प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ॥ रामा जनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ॥ आरती ज्ञानराजा० ॥ २ ॥

********

# आरती विठ्ठलाची

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥ जय देव जय देव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा, राईच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ ध्रु० ॥ तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥ देव सुरवर नित्य येति भेटीं ॥ गरुड हनूमंत पुढें उभे रहाती ॥ जय० ॥ २ ॥ धन्य वेणुनाद अनुक्षेत्र पाळा । सुवर्णाचीं कमळें वनमाळा गळां । राई रखुमाबाई राणीया सकळा । ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥ जय० ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या

कुर्वंड्या येती । चंद्रभागेमाजीं सोडुनियां देती ॥ दिंड्या पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ जय० ॥ ४ ॥

आषाढी कार्तिकीं भक्तजन येती । चंद्रभागेमाजीं स्नानें जे करिती ॥ दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ती ॥ केशवासी नामदेव भावें ओंवाळीती ॥ जय देव० ॥ ५ ॥

********

प्रकाशक
केशव भिकाजी ढवळे,
श्रीसमर्थ-सदन, गिरगांव, मुंबई

प्रथमावृत्ति, फाल्गुन, शक १८६१
द्वितीयावृत्ति, आषाढ, शक १८६३
तृतीयावृत्ति, आषाढ, शक १८७१

मुद्रक
वा. ग. ढवळे,
कर्नाटक मुद्रणालय
१०३, शींव, मुंबई २२

